


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---

*✻ मराठी अभ्यास परिषद : रौप्यमहोत्सवी वर्षाची सांगता ✻*

---


संपादक : प्र.ना. परांजपे

संपादन-सल्लागार : अशोक रा. केळकर, गं.ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण

संपादन-समिती : प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी

संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके : प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास,
गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७

प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी
अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५,
वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५

मुद्रण-स्थळ : भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे ५१.

---

प्रकाशन : त्रैमासिक: जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)


सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) या अंकाच्या प्रकाशनासाठी **महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे** अनुदान मिळालेले आहे. तसेच **मैसूर** येथील **भारतीय भाषासंस्थान** यांचेही अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन, तसेच भारतीय भाषासंस्थान सहमत असतीलच असे नाही.

---

या अंकाचे मूल्य रु. २५/-

संपादकीय

# भाषाव्यवहारातील उदारमतवाद

बौद्धिक जीवनामध्ये उदारमतवाद आणि राजकीय जीवनामध्ये लोकशाही ही मूल्ये आपण ब्रिटिशांकडून शिकलो, पण ती आपण खऱ्या अर्थाने आत्मसात केली आहेत का ? क्षुल्लक बाबतीतही भिन्न मत मांडले गेले तर काही लोक असहिष्णू बनतात, त्यांची भाषा (आणि कधी कृतीही) हिंसक बनते. भाषिक व्यवहारातही आपल्याला या वस्तुस्थितीचा प्रत्यही प्रत्यय येतो. फक्त आपलेच मत 'शास्त्रशुद्ध' आहे आणि त्यापेक्षा भिन्न मत असणारे भाषेचे मारेकरी आहेत, त्यांच्या 'अशुद्ध' प्रयोगांमुळे भाषा भ्रष्ट होईल आणि त्यामुळे काही काळानंतर ती नष्ट होईल किंवा आपली ओळख हरवून बसेल असे त्यांचे म्हणणे असते.

१९६२मध्ये साहित्य मंडळाने 'शुद्ध'लेखनविषयक नवे नियम बनविले आणि भाषेतील शुद्धाशुद्धतेच्या वादाला (किंवा वादांना !) अभिनिवेशाची बाधा झाली. भाषेचे लेखन सर्वसामान्य माणसाच्या दृष्टीने सोपे असावे, हा त्या नियमांमागील हेतू होता. अनुस्वार, ऱ्हस्व-दीर्घ यांच्या गुंत्यामुळे सामान्य माणूस गोंधळून जाई आणि 'शुद्ध'लेखन ही फक्त पंडितांची, उच्च शिक्षितांची (आणि पर्यायाने उच्च वर्णीयांची) मिरासदारी आहे, असे त्याला वाटू लागे.

या वादाचे मूळ 'शुद्ध' या शब्दामध्ये आहे असे कधी कधी वाटते. आपल्या सामाजिक जीवनातील सोवळ्या-ओवळ्याच्या कल्पना, विटाळ व शुद्धीच्या कल्पना यांचा संबंध धार्मिक दंडकांशी, जातिभेदाच्या, स्पृश्यास्पृश्यतेच्या रूढींशी आहे. सामाजिक जीवनात शुद्धाशुद्धतेच्या कल्पना कडक होत्या त्या काळात – म्हणजे १९व्या शतकात – या कल्पना भाषिक विचारातही शिरल्या असाव्यात. म्हणूनच त्या वेळी 'शुद्ध कसे बोलावे व शुद्ध कसे लिहावे' हे व्याकरणाचे मुख्य कार्य मानले गेले. पण हळूहळू सोवळ्या-ओवळ्याच्या, स्पृश्यास्पृश्यतेच्या कल्पना कालबाह्य ठरल्या आणि आपण त्यांचा त्याग केला. पण भाषेतील शुद्धाशुद्धतेचा वेताळ आपल्या मानगुटीवरून अजून उतरलेला नाही.

याचा अर्थ असा नव्हे की भाषाव्यवहारात नियमच नसावेत. प्रत्येक व्यक्तीची, प्रत्येक समूहाची, प्रत्येक प्रदेशाची भाषा इतरांपेक्षा थोड्या प्रमाणात का होईना पण भिन्न असते. पण ते भिन्नत्वाचे कंगोरे टाळून सर्वांना समान असणाऱ्या वैशिष्ट्यांचा

उपयोग केला तरच परस्परांमधील व्यवहार शक्य होतो. त्यासाठीच प्रमाणभाषेची गरज असते. पण प्रमाणभाषा म्हणजे 'शुद्ध' भाषा नव्हे. जास्तीत जास्त लोकांना आकलनसुलभ असणे ही प्रमाणभाषेची कसोटी असते. याउलट 'शुद्ध' भाषेसाठी संस्कृत व्याकरणाच्या कसोट्या लादण्यात येतात. आपली भाषा संस्कृतोद्भव आहे असे बहुसंख्य मराठी भाषक मानतात हे खरे; पण म्हणून अजूनही या भाषेला संस्कृतचा सासुरवास कशाला ? त्यातून आता तर असाही एक सिद्धान्त मांडला जात आहे की मराठी, कन्नड, तमीळ इ० लोकभाषा संस्कृतपूर्व आहेत आणि आंतरविभागीय दळणवळणासाठी त्या लोकभाषांतून संस्कृत ही कृत्रिम भाषा बनविण्यात आली असावी ! महाभारतातही मराठी शब्द व लोकोक्ती आढळतात असे प्रा. कृ.श्री. अर्जुनवाडकरांनी 'भाषा आणि जीवन'मध्येच प्रसिद्ध झालेल्या एका लेखात दाखवून दिले होते.

या संदर्भात दुसऱ्या एका क्षेत्रातील उदाहरण आठवते. भारतातील गरिबीचे निकष ठरवताना ज्या व्यक्तीला रोज ठरावीक उष्मांक असलेला आहार मिळत नाही, ती व्यक्ती गरीब अशी एक कसोटी मानली जाई. पण डॉ. पी.व्ही. सुखात्मे यांनी दाखवून दिले की या कसोटीत गृहित धरलेले उष्मांक हे युरोपीय आहाराच्या आधारे ठरविण्यात आले आहेत. युरोप हा थंड प्रदेश असल्यामुळे शरीराचे उष्णतामान टिकविण्यासाठी तेथील आहारात जास्त उष्मांक आवश्यक असतात. पण भारत उष्ण कटिबंधात असल्यामुळे भारतीय माणसाला तितक्या उष्मांकांची गरज नसते. त्यामुळे भारतातील गरिबीची व्याख्या करताना येथील हवामान लक्षात घेऊन आवश्यक उष्मांक ठरविले पाहिजेत.

मराठीच्या लेखनाबाबतीतही संस्कृतमधील नियमांचा आधार घेतला तर मराठीतील लेखन 'गरीब' ठरेल. 'प्रमाण' भाषा ही वरून कुणीतरी लादलेली आदेशात्मक 'तयार' भाषा नसते. मराठीतील मान्यताप्राप्त लेखनातील विशेष एकत्र करून ती सिद्ध होते. त्यामुळे तिला संस्कृत व्याकरणाचे दंडक लावून शुद्ध किंवा अशुद्ध ठरवण्याचा किंवा शुद्ध करण्याचा खटाटोप कशासाठी ?

सामासिक शब्दांच्या लेखनाचे उदाहरण आपण घेऊ. सामासिक शब्द (=जोडशब्द) ही एक लेखनसुविधा आहे. त्यांच्यामुळे श्रम, वेळ इत्यादींची बचत होते. लेखनात भारदस्तताही येते. पण सामासिक शब्द (किंवा 'जोडशब्द') तयार होण्याच्या प्रक्रियेत साधारणत: तीन टप्पे असतात. पहिल्या टप्प्यात ते शब्द व्याकरणिक प्रत्ययांनी जोडलेले असतात. दुसऱ्या टप्प्यात व्याकरणिक प्रत्ययांची जागा संयोगी चिन्ह घेते आणि तिसऱ्या टप्प्यात ते शब्द संयोगी चिन्ह वगळून एकच शब्द

असल्याप्रमाणे जोडून लिहिले जाऊ लागतात. या प्रक्रियेत दोनापेक्षा अधिक शब्द सामील असतील तर व्याकरणिक प्रत्यय गळाले तरी संयोगी चिन्ह वापरले जात नाही अथवा ते शब्द जोडूनही लिहिले जात नाहीत, उदाहरणार्थ, 'महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ' किंवा 'राज्य मराठी विकास संस्था' किंवा 'मराठी अभ्यास परिषद' ! अशा परिस्थितीत संस्कृतमधील सामासिक शब्दांमध्ये संयोगी चिन्ह किंवा अंतर असत नाही म्हणून मराठीतील सामासिक शब्दांत ते वापरणे चूक आहे, भाषाशुद्धतेच्या दृष्टीने तो महान गुन्हा आहे, असे कसे म्हणता येईल ?

वर्णोच्चारापासून लेखनपद्धतीपर्यंत मराठीत अनेक बदल झाले आहेत; अजूनही होत आहेत. ऋ, ऌ, इ० स्वर आजच्या मराठीत आढळत नाहीत. 'ष'चा उच्चारही बहुसंख्य मराठी भाषकांच्या बोलण्यात ऐकू येत नाही. इंग्रजीच्या प्रभावामुळे मराठीत शिरलेल्या 'ॲ', 'ऑ' ह्या स्वरांचीही दखल घेण्याची गरज आता सर्वांना जाणवते आहे. भाषेच्या मूलभूत घटकांमध्ये होत असलेले असे बदल आपण स्वीकारत आहोत, तर शब्द, शब्दसंहती, इत्यादींच्या बाबतीत होत असलेले बदल – ते रूढ झाल्यानंतर का होईना – स्वीकारायला काय हरकत आहे ?

मराठीतील जोडाक्षरांबाबतही असाच विवेक करायला हवा आहे. अनेक जोडाक्षरे ही स्वतंत्र अक्षरेच आहेत. 'क्ष', 'ज्ञ', 'द्य', 'क्त' ही उच्चारात जोडाक्षरे आहेत, पण लेखनात वेगळी अक्षरेच आहेत. विद्यार्थ्यांना, विशेषतः अन्यभाषिक विद्यार्थ्यांना, ती शिकण्यासाठी वेगळा प्रयत्न करावा लागत असणार. मुद्रणामध्येही त्यांच्यामुळे अडचणी येतात. संगणकावर मराठी लिपी बसवण्यात (संपूर्णपणे स्वतंत्र आज्ञावली वापरून, रोमन लिपीच्या कुबड्या वापरून नव्हे !) ज्या अनेक अडचणी आहेत त्यात जोडाक्षरांचा वाटा काही कमी नाही ! त्यांत लेखनसुलभतेच्या दृष्टीने काही बदल सुचवले गेले तर त्याबद्दलही आग्रही भूमिका कालौघात टिकेल का, याचा विचार करायला हवा.

खरं म्हणजे भाषेत चूक आणि बरोबर अशी द्विस्तरीय विभागणी नसते. या दोन स्तरांमधील सीमाप्रदेश बराच मोठा असतो. त्या सीमाप्रदेशातील प्रयोगांना आपण 'क्षम्य' मानावे आणि भाषेत 'निर्दोष' 'क्षम्य' व 'अक्षम्य' अशी त्रिस्तरीय विभागणी असते, हे लक्षात घ्यावे. आपण स्वतः नेहमी 'निर्दोष' भाषा वापरावी, अध्यापनात 'निर्दोष' भाषा शिकवावी; पण इतरांनी केलेल्या कोणत्या 'चुका' क्षम्य मानाव्यात आणि कोणत्या 'अक्षम्य' या बाबतीत विवेक करावा. या दोन्ही प्रकारच्या चुकांना एकाच मापाने मोजू नये आणि एकाच हिंस्रतेने झोडू नये. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत भाषा वापरली जाते. तिच्या वापराचे क्षेत्रविशिष्ट निकष भिन्न असू शकतात, नव्हे

असतात. निबंधात लिहिण्याची भाषा, वर्तमानपत्रात लिहिण्याची भाषा आणि नभोवाणी-चित्रवाणीसारख्या माध्यमांमध्ये 'उच्चारण्या'साठी लिहिलेली भाषा यांत फरक असणारच. त्यातल्या 'क्षम्य' आणि 'अक्षम्य' या दोन्ही प्रकारच्या 'चुकां'बद्दल सारखीच प्रतिक्रिया आली तर 'क्षम्य' चुकावाले व 'अक्षम्य' चुकावाले एकमेकांच्या मदतीसाठी एकत्र येतील, त्यांच्यावर टीकास्त्र सोडणारे अल्पसंख्य ठरतील आणि अखेरीस भाषेचे अधिकच नुकसान होईल.

सोवळ्याच्या आग्रहाचे काय परिणाम झाले हे आपल्याला माहीत आहे. आता सोवळे जवळजवळ इतिहासजमा झाले आहे. मराठीच्या बाबतीत असे व्हायला नको असेल तर आपण आपले दुराग्रह बाजूला ठेवून भाषाव्यवहारातही उदारमतवादी लोकशाही प्रणालीचा मनापासून स्वीकार करायला हवा.

■

– प्र. ना. परांजपे

---

## लेखकांसाठी सूचना

लिखाण हस्तलिखित असो की टंकलिखित, ते कागदाच्या एकाच बाजूस सुवाच्य असावे. ओळींमध्ये व लिखाणाच्या चारही बाजूंना व्यवस्थित अंतर ठेवावे. लेखात इंग्रजी अवतरणे असल्यास त्यांचे मराठी भाषांतरही द्यावे. व्यक्तींची, ग्रंथांची नावे, लेखांची शीर्षके, पारिभाषिक संज्ञा इ० देवनागरी लिपीत लिहावे. अतिशय अपरिहार्य असेल अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा. लिखाणाच्या शीर्षकानंतर लेखकाने स्वत:चे नाव लिहावे. लिखाणाच्या शेवटी, थोडी जागा सोडून, पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता (पिनकोडसह) लिहावा. नावातील आद्याक्षरे मराठी लेखनपद्धतीप्रमाणे द्यावीत. ('ए.आर.' नको; 'अ.रा.' हवे.) लिखाणाची भाषा शक्यतो सोपी व नेमकी असावी. पुनरुक्ती, अनावश्यक शब्दयोजना, क्लिष्ट वाक्यरचना टाळावी. लिखाणासोबत स्वतंत्र कागदावर स्वत:चा परिचय (शिक्षण, व्यवसाय, प्रकाशित लेखन इ०) थोडक्यात द्यावा. दूरध्वनी क्रमांक (संकेतक्रमांकासह) द्यावा.

---

# वाक्यचिन्हे कशाला ?

द. भि. कुलकर्णी

शब्दांचा नुसता समूह म्हणजे वाक्य नव्हे. 'राम गोविंद हिमालय उंच चढ' हा शब्दसमूह आहे; पण हे वाक्य नाही. का ? कारण या शब्दसमूहातून एक सलग अर्थ (एकार्थ) व्यक्त होत नाही. एकार्थही का व्यक्त होत नाही तर इथे शब्द एकमेकांशी जोडले जात नाहीत; ते सुटे सुटे राहतात; त्या शब्दांना अर्थ असतो; पण त्या शब्दसमूहाला एकत्र अर्थ प्राप्त होत नाही. तसा तो प्राप्त व्हावा म्हणून तर आपण सामान्यरूपे, विभिक्तिप्रत्यय, कारकप्रत्यय इत्यादींची जोड त्यांना देऊन ''रामा आणि गोविंदा हिमालयावर उंच चढून गेले'' असा एकार्थ त्यातून प्रकट करतो.

समजा, पुढे आपण असे म्हटले, ''हिमालय चढता चढता रामा थकला गोविंदा थकला त्यांनी थोडी विश्रांती घेतली ते जेवले झोपले दुसऱ्या दिवशी ते पुन्हा ताजेतवाने झाले हिमालय चढू लागले.''

इथे या शब्दसमूहात एकार्थ आला आहे, हे खास; पण त्यात असंदिग्धता, ग्रहणसुलभता जितकी येऊ शकली असती तितकी आलेली नाही; जसे, ते दोघे जेवले आणि झोपले की जेवले आणि मग दुसऱ्या दिवशी झोपले, असा वावदूकपणा एखादा शहाणा करू शकेल ! म्हणून मग आपण –

''हिमालयावर चढता चढता रामा थकला, गोविंदाही थकला; मग त्या दोघांनी थोडी विश्रांती घेतली; मग ते जेवले, झोपले. दुसऱ्या दिवशी ते पुन्हा ताजेतवाने झाले व हिमालयाचा चढ चढू लागले.''

इथे आपण काही शब्दांचीच भर घातली नाही तर स्वल्पविराम (,), अर्धविराम (;), पूर्णविराम (.) इत्यादी वाक्यचिन्हांचीही भर घातली; व त्यामुळे वाक्याचा अर्थबोध असंदिग्ध आणि ग्रहणसुलभ झाला.

आधी शब्द, मग शब्दसमूह, मग एकार्थपर वाक्य, मग अर्थ असंदिग्ध व ग्रहणसुलभ करण्यासाठी वाक्यचिन्हे अशी ही प्रक्रिया क्रमबद्ध नसते; एक सलग आशय आपल्या मनात असतो आणि तो या सर्व घटकांतून सलगपणेच प्रकटत असतो;

बोलताना किंवा लिहिताना किंवा त्याबद्दल असा विचार करताना ते घटक विभिन्न दिसत असले तरी ते तसे विभिन्न नसतात; एकरूपच असतात. त्यांचे हे एकरूपत्व जाणवावे म्हणून तर आपण सामान्यरूपे, विभिक्तिप्रत्यय, कारकप्रत्यय इत्यादींचा अवलंब करीत असतो; हे आपल्याला पटते – म्हणजे हे सारे घटक वाक्याचेच अंगभूत अवयव आहेत, हे आपणांस पटते; पण वाक्यचिन्हांचे काय ? अक्षरांपेक्षा या वाक्यचिन्हांचा आकार लहान आणि वेगळा असल्यामुळे आणि त्यांच्या जागाही वाक्यात सुट्या सुट्या असल्यामुळे ही वाक्यचिन्हे उपरी आणि गौण आहेत अशी आपली समजूत होते व आपण नकळत त्यांच्याकडे काणाडोळा करतो.

खरे तर ही वाक्यचिन्हे वाक्याचा म्हणजे एकार्थ शब्दसमूहाचा अविभाज्य अंश असतात; ती अर्थरूपच असतात. त्यांना विरामचिन्हे म्हटल्यामुळेही ती वाक्यभिन्न अंश आहेत असे आपणांस वाटते.

वाक्यार्थ म्हणून विरामचिन्हांकडे पाहिले म्हणजे त्यांचे महत्त्व लक्षात येते.

या वाक्यचिन्हांचे दोन ठळक प्रकार आहेत हेही आपण लक्षात घेत नाही; माझ्या ते कसे लक्षात आले ते सांगतो :

दारव्हेकर मास्तर तेव्हा नागपूर आकाशवाणीवर अधिकारी होते. एकदा ते मला म्हणाले, ''अरे 'की'च्या आधी स्वल्पविराम की नंतर ?'' मास्तर माझे मास्तरच होते. कुर्वे शाळेत. त्यामुळे ते अधिकारी झाले आणि मी प्राध्यापक झालो तरी आमचे नाते शिक्षक-विद्यार्थी असेच होते. मी म्हटलं, ''सर, उदाहरण द्या.'' मला वाटलं, सर माझी परीक्षा घेताहेत; उत्तर सुचायला थोडी उसंत मिळावी म्हणून मी म्हटलं, ''सर, उदाहरण द्या.''

सर म्हणाले, ''मला असं वाटतं की त्यानं काम केलं नाही.''

मी म्हटलं, ''इथं स्वल्पविरामाचं स्थान वैकल्पिक आहे – आधी द्या, नंतर द्या. मी स्वत: आधी देतो.''

त्या उत्तरानं सरांचं समाधान झालं की नाही माहीत नाही; पण माझं स्वत:चं समाधान मात्र झालं नाही. पुढे पुष्कळ दिवसांनंतर या प्रश्नाचं उत्तर सापडलं : आकाशवाणी अधिकारी म्हणून सरांना आम्हा अनेकांची हस्तलिखितं वाचावी लागत. त्यांत आम्ही 'की'च्या आधीच स्वल्पविराम देत होतो; पण वाचताना मात्र विराम 'की'च्या नंतर घेत होतो.

असे आहे तर – मी मनात म्हटले : दृष्टिनिष्ठ विरामचिन्हे वेगळी, श्रुतिनिष्ठ विरामचिन्हे वेगळी. विजय तेंडुलकर, सुरेश भट, अशोक प्रभाकर मोटे यांच्या लेखनात दीर्घ विरामदर्शक आणि अपूर्णतादर्शक विरामचिन्हे (....) येतात ती श्रुतिनिष्ठ विराम-

चिन्हे असतात; विंदा करंदीकर यांच्या कवितांत अर्धा शब्द एकेरी अवतरण चिन्हांत असतो; तो दृष्टिनिष्ठ वाक्यचिन्हाचा प्रकार असतो.

आपल्याला कोणत्या प्रकारची वाक्यचिन्हे वापरावयाची आहेत याबाबत नीट निर्णय घेऊन आपण साऱ्यांनी त्यांचा वापर केला पाहिजे. कहाण्या, लोकगीते, ओवी, अभंग, आरत्या, पोवाडे, लावण्या इत्यादी प्राचीन मौखिक साहित्य लिखित स्वरूपात सादर करताना संशोधकांनी हा विवेक ठेवला पाहिजे; केवळ प्रतभेद, पाठभेद यांचा विवेक करून चालणार नाही. अभिनय, करपल्लवी, नेत्रपल्लवी, भावसूर (काकुस्वर), ऱ्हस्व-दीर्घ-अतिदीर्घ विराम इत्यादींच्या मदतीने तत्कालीन सादरकर्ते वाक्याशय श्रोत्यांपर्यंत पोचवीत होते; लिखित स्वरूपात तो तसा कसा पोचणार ? प्राचीन मराठीत ':', '।', '॥' अशी मोजकीच विरामचिन्हे का होती याचा अशा वेळी आपणांस बोध होतो. मग प्रश्न पडतो की, या मौखिक साहित्याचे संपादन करताना आधुनिक विरामचिन्हे वापरावीत का ? त्यामुळे त्यांचे मौखिक पर्यावरण दूषित तर होणार नाही ? – आणि जर दृष्टिनिष्ठ वाक्यचिन्हे वापरली नाहीत तर वाचकाला– श्रोत्याला नव्हे – त्यांचा आशय नीट ग्रहण तरी कसा होणार ? ज्ञानेश्वरीतील अनेक ओव्या प्रश्नात्मक आहेत, तो ज्ञानेश्वरीचा एक शैलीविशेष आहे; तो वाचकापासून दडवून ठेवणे कितपत उचित ठरेल ?

आणखी एक : अनेकदा एकाऐवजी दोन किंवा तीन वाक्यचिन्हे वापरणे आवश्यक असते; जसे, '?...', '!-' पण सध्या तशी रूढी नाही; वाक्यचिन्हे ही जर दृष्टिसापेक्ष व अर्थसापेक्ष वाक्यचिन्हे असतील तर – तर तसे यापुढे करावेच लागेल. कवी सुरेश भट उद्‌गारचिन्हांचा प्राचुर्याने का वापर करीत असत व कधी कधी एकाऐवजी दोन-तीन उद्‌गारचिन्हे ते का योजित असत ते लक्षात येईल व शरच्चंद्र मुक्तिबोधांना 'नवी मळवाट'मधील विरामचिन्हांचेही परिष्करण करणे का अवघड गेले तेही आता लक्षात येईल.

वाक्यचिन्हांचा काटेकोर आणि काटेतोल वापर करावा तो कै. मर्ढेकरांनी. 'मर्ढेकरी काव्य : छंद:शास्त्रीय अवलोकन' या लेखात (कवितारती, धुळे, मे-जून-जुलै-ऑगस्ट, २००५) डॉ. शुभांगी पातुरकर या संशोधिकेने, छंद:शास्त्राच्या अंगाने, त्याचे उचित उद्‌घाटन केले आहे. आजचे अनेक नवे कवी याबाबत 'निरंकुश' आहेत. ''कवींना पहिला नियम छंदाचा; त्यानंतरच शुद्धलेखनाचा'' असे आपण म्हटले की ते म्हणतात, ''आम्ही छंद:शास्त्र मानत नाही; मग शुद्धलेखनाचा प्रश्नच नाही.'' याला काय म्हणावे ?

वाक्य एकार्थक असूनच चालत नाही; तसा प्रत्ययही श्रोता-वाचक यांना यावा

लागतो; त्यासाठीच तर वाक्याचा संदर्भात 'अर्थसुसंगती' (योग्यता), अर्थाच्या संदर्भात 'जिज्ञासापूर्ती' (आकांक्षा) आणि 'अर्थाची अखंडता' (सान्निध्य) या गुणांची अनिवार्यता असते. ''रामा आणि गोविंदा गंगेवर चढले'' असे (काव्यात नव्हे) वाच्यार्थनिष्ठ वाक्यात म्हणताच येणार नाही; कारण त्यात अर्थसुसंगती नाही; म्हणूनच ते 'वाक्य' नाही; तो फक्त शब्दसमूह आहे.

एवढ्यानेही भागत नाही.

''रामा आणि गोविंदा गंगेवर'' हाही शब्दसमूहच आहे; हे वाक्य नाही; इथे कारण वेगळे आहे : 'हे वाक्य अपूर्ण आहे' असे आपण व्यवहारात म्हणू; शास्त्रीय भाषेत, 'या शब्दसमूहात आकांक्षा हा गुण नाही' असे म्हणतात.

एवढ्यानेही भागत नाही.

''रामा आणि गोविंदा गंगेवर पोहायला गेले'' या शब्दसमूहात योग्यता गुण आहे, आकांक्षा गुणही आहे; पण यातील शब्दांचा उच्चार आपण ''रामा... आणि... गोविंदा... गंगे...वर... पोहायला... गेले'' असे विराम घेत घेत, केला तर ते 'वाक्य' होणारच नाही. का ? तर शब्दसमूहाचा अर्थ अखंडितपणे प्रतीत झाला तरच त्या शब्दसमूहाला वाक्यत्व प्राप्त होत असते. कधी कधी लहान मुले सहेतुकपणे ''आई, मी ना... पास झालो'' असे म्हणतात; तमाशात सोंगाड्या सहेतुकपणे, विनोदासाठी सान्निध्य गुणभंग करीत असतो, हे आपण जाणतोच.

वाङ्मयकृती, मग तिची शब्दसंख्या - वा - वाक्यसंख्या कितीही असो, एकार्थक वाक्यच असते; म्हणून तर वाङ्मयकृतीला 'महावाक्य' म्हणतात. मात्र तिथे योग्यता-आकांक्षा-सान्निध्य या गुणांचे स्वरूप बदलते; कारण तिथे वाच्यार्थ - तात्पर्यार्थ हे अर्थ प्रधान नसतात; लाक्षणिक अर्थ (अर्थालंकार, म्हणी, वाक्प्रचार इत्यादी) त्याहून महत्त्वाचे असतात; आणि त्याहून महत्त्वाचा असतो व्यंग्यार्थ – म्हणून तिथे योग्यता - आकांक्षा - सान्निध्य यांचा अभिप्राय बदलून जातो. वाङ्मयाकृतीच्या संदर्भात–

(१) योग्यता म्हणजे संभवनीयता

(२) आकांक्षा म्हणजे पूर्णता

(३) सान्निध्य म्हणजे अखंडता

संभवनीयता हा गुण लेखक- सापेक्षतेने समजावून घ्यायचा.

पूर्णता हा गुण घटक-सापेक्षतेने समजावून घ्यायचा.

अखंडता हा गुण श्रवण-सापेक्षतेने/वाचन-सापेक्षतेने समजावून घ्यायचा.

या क्षेत्रभेदामुळेच वाङ्मयकृतीतील वाक्यचिन्हे वेगळी असतात; चरण (ओळ), कडवे; प्रवेश, अंक; प्रकरणे, अध्याय; सर्ग, खंड इत्यादी सारे घटक वाङ्मयकृतीतील

विरामचिन्हेच असतात. ती जाणून निर्मात्याचा अभिप्राय आणि घटकांचे व्यूह यांचा अखंड प्रत्यय घेणे ही रसिकाची जबाबदारी असते. ही अखंडता कालोत्पन्न नसते; आस्वादोत्पन्न असते.

वाङ्मयकृतीतही व्यावहारिक वाक्यचिन्हे – स्वल्पविराम, अर्धविराम इत्यादी – असतातच; पण त्याबाबत लेखक-कवी स्वातंत्र्य घेऊ शकतात; कारण 'शुद्धलेखनाचे नियम नंतर – त्याआधी छंद:शास्त्राचे नियम' हे जसे खरे आहे तसेच 'वाङ्मयीन वाक्यचिन्हांचे नियम आधी – व्यावहारिक विरामचिन्हांचे नियम नंतर' हाही त्रिकालाबाधित सिद्धान्त आहे.

■

डीएसके-विश्व, 'वसुधा', ई-००४, ऑफ सिंहगड रोड, धायरी, पुणे 411041.
दूरध्वनी : २४३८०८९४

# मो. वि. भाटवडेकर

– प्र. ना. परांजपे

रोझेच्या थिसॉरसची आठवण होईल असा 'मराठी पर्यायी शब्दांचा कोश' वयाच्या पंचाहत्तरीनंतर सिद्ध करणारे मो.वि. भाटवडेकर यांचे ३० जुलै, २००६ रोजी दुःखद निधन झाले. ते मराठी अभ्यास परिषदेचे सभासद व 'भाषा आणि जीवन'चे लेखक होते. मृत्युसमयी त्यांचे वय ८६ वर्षांचे होते. पर्यायी शब्दांच्या कोशानंतर त्यांनी 'बृहत्मराठी शब्दकोश' सिद्ध केला आणि नजीकच्या भविष्यकाळात राजहंस प्रकाशनातर्फे तो प्रकाशित होणार आहे.

भाटवडेकरांचा मूळ अभ्यासविषय अर्थशास्त्र. त्यात त्यांनी लंडन युनिव्हर्सिटीची पीएच्.डी.पदवी मिळवली होती. प्रारंभीची पाच वर्षे (१९४१-४६) मुंबईतील आर.ए.पोदार महाविद्यालयात अध्यापन केल्यानंतर त्यांनी भारत सरकारची बारा वर्षे सेवा केली. त्यानंतर संयुक्त राष्ट्रसंघाचे 'इकॉनॉमिक्स कमिशन फॉर एशिया अँड फार ईस्ट' (पाच वर्षे), युनेस्को (दीड वर्ष), संयुक्त राष्ट्रसंघाची 'एशियन इन्स्टिट्यूट फॉर इकनॉमिक डेव्हलपमेंट ॲण्ड प्लॅनिंग' (नऊ वर्षे) या आंतरराष्ट्रीय संस्थांमध्ये त्यांनी सेवा केली. १९७३मध्ये भारतात परतल्यानंतर त्यांनी 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ बँक मॅनेजमेंट'मध्ये 'प्रोफेसर' म्हणून काम केले. ह्या काळात त्यांनी अनेक पुस्तके, अहवाल व लेख लिहिले.

भाटवडेकरांच्या आवडीचा दुसरा अभ्यासविषय म्हणजे संगीत. त्यातही त्यांनी चिकित्सक लेखन केले आणि 'संगीत कला विहार' या नियतकालिकाचे ऑगस्ट १९९३ ते डिसेंबर १९९३ या काळात संपादन केले. वयाच्या पंचाहत्तरीनंतर (त्यांचा जन्मदिनांक ४ ऑक्टोबर १९१९ हा होता.) ते शब्दकोशाकडे वळले. सामाजिक जबाबदारीची तीव्र व सखोल जाणीव असल्यामुळेच ते अखेरपर्यंत समाजोपयोगी कामात व्यग्र होते. मूल्याधिष्ठित वैचारिक स्वभाव, शास्त्रकाट्याच्या निकषाचा आग्रह, विषयाच्या मुळाशी जाणारे संशोधन व सुबोध तर्कशुद्ध मांडणी हे त्यांचे विशेष होते. आपल्या गुणांची जाणीव व आत्मविश्वास असला तरी त्यांच्यात 'अहम्'चा अभाव

होता. आपल्या मोठेपणाचा गाजावाजा करण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता.

'मराठी पर्यायी शब्दांचा कोश'च्या प्रस्तावनेत त्यांनी समानार्थी शब्द व पर्यायी शब्द यांच्यातील भेद स्पष्ट केला आहे आणि 'अर्थच्छटा कोशा'ची संकल्पना मांडली आहे. अर्थच्छटा शब्दकोशाचा त्यांचा संकल्प पूर्ण करण्यासाठी त्यांना आणखी काही वर्षे मिळावयास हवी होती. ■

सी-१, सुरजबन सहनिवास, पुणे 411007.

---

## प्रतिसाद १

**डॉ. गीता भागवत**

माझ्या बाळबोध ज्ञानानुसार यथोचित भाषावापराच्या दृष्टीने दिवंगत व्यक्तीबद्दल लिहिताना **'श्रद्धांजली'** हा शब्द वापरावा आणि जिवंत व्यक्तीबद्दल बोलताना - लिहिताना **भावांजली, आदरांजली** असे शब्द वापरावेत.

आजकाल वृत्तपत्रांमधून/दूरदर्शनवर बरेचदा दिवंगत व्यक्तीच्या संदर्भात 'आदरांजली' हा शब्द वापरला गेला. प्रत्येक वेळी मला तो खटकला. पण गोबेल्स तंत्राच्या प्रभावाने आता हा 'आदरांजली' शब्द लेखकांच्या मनातही रुजला-मुरला आहे असे वाटते. ह्यात व्यक्तीबद्दल आदराची, सन्मानाची, गौरवाची, स्नेहाची भावना व्यक्त करण्यासाठी, त्या व्यक्तीचे अभिनंदन करण्यासाठी, त्या व्यक्तीला अभिवादन करण्यासाठी लेख लिहिला तर त्याला काय म्हणायचे ? बरोबर काय ? चूक काय ? कृपया भाषातज्ज्ञांनी यावर प्रकाश टाकावा. हा झाला भाषेवरचा आर्थिक अत्याचार ! पण भाषेवरचे लैंगिक अत्याचारही पदोपदी आढळत असतात. अलीकडे 'शस्त्रसंधी' हा शब्द भल्याभल्यांनी पुन:पुन्हा स्त्रीलिंगी वापरल्याचे दिसले. युद्धनीतिमधला संधी (तह) आणि दैनंदिन व्यवहारातली संधी (मोका) या दोन्ही बाबतीत 'ती संधी' असाच वापर केला गेला. व्याकरणातला संधी (वर्णसंयोग) माहीतच नसावा !

'थोडे दिवस त्याच्या कलेनं घ्यावं !' ('कलानं' ऐवजी) हे वाक्य कितीतरी वेळा दूरदर्शन-मालिकांच्या संवादात ऐकले. कल (पुं.) आणि कला (स्त्री.) हा फरक लक्षातच घेतलेला नाही.

भाषास्वातंत्र्याच्या निशाणाखाली भाषेवर केले जाणारे असे अत्याचार आपण 'चालायचंय !' असे म्हणून चालवून घ्यायचे ? त्यांचा निषेध करून गप्प बसायचं ? भाषा जागरणाची चळवळ उभी करायची (एड्स/पोलिओ चळवळीसारखी) –? ■

९, रानडे कॉटेज सोसायटी, परांजपे 'बी' स्कीम, ३रा रस्ता, हनुमान रोड,
विले पार्ले (पूर्व) मुंबई 400 057. दूरध्वनी ०२२२-२६११७७७३

---

# दुर्वासशापाचे कोडे

मा.ना. आचार्य

१. तेयातें लेकुरपणें झांकविलें ।
एकांचे गर्भवास साहिले ।
परि विश्वरूप हें राहविलें ।
दाविचिना ॥ (११.३५) **ज्ञानदेवी,** (मंगरूळकर-केळकर संपादित मुंबई विद्यापीठ प्रत, १९९४)

प्रस्तुत ओवीचा संदर्भ असा : दहाव्या अध्यायात आपल्या प्रमुख अशा ७५ विभूती सांगितल्यानंतर श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले, 'सर्व प्राणिमात्रांचे बीज मीच आहे व संपूर्ण विश्व त्याचाच विस्तार आहे. (उक्त प्रत - १०.२८०) अर्जुनाला हे पटले; परंतु त्यामुळे भगवंताचे विश्वरूप पाहण्याची इच्छा त्याला वाटू लागली. पण एक शंका त्याला त्रास देऊ लागली – 'मी जरी श्रीकृष्णाच्या सलगीतला असलो, तरी ते गूढ विश्वरूप व्यक्त करण्यास त्याला कसे सांगावे ?' कारण अर्जुनाहूनही प्रिय व्यक्ती व भक्त यांपासून हे विश्वरूप श्रीकृष्णांनी गूढच राखले होते. म्हणून तो म्हणतो, 'मी काय सनकादिकांहून आगळा आहे का ? त्यांनीही अशी धिटाई मुळीच केली नाही. आणि मी काय गोकुळातल्या प्रेमळ सवंगड्यांहून श्रीकृष्णाला अधिक प्रिय आहे का ?' (११.३४) यापुढे उपरोक्त ओवीत तो म्हणतो, 'त्यांना (=नंद-यशोदांना) आपल्या बाळभावाने ठकविले. काहींच्या (अर्थात् - वसुदेवदेवकींच्या) बाबतीत गर्भवास सोसले. पण हे विश्वरूप (मात्र त्या सर्वांच्याहीपासून) राखून ठेवले; दाखविलेच नाही.' प्रस्तुत ओवीतील 'एकांचे गर्भवास साहिले' या द्वितीय चरणाचा व त्यातील संदर्भाचा थोडा विचार प्रस्तुत टिपणात करावयाचा आहे.

**२. काही पाठभेद :** प्रस्तुत द्वितीय चरणाचे काही महत्त्वाचे पाठभेद आता नोंदून घेऊ.

आपण स्वीकारलेला पाठ (मंगरूळकर-केळकर) हा राजवाडे संशोधित ज्ञानदेवीतील पाठ आहे. राजवाडे प्रत इ.स. १९०८-०९ सालची. तिची (विकृत)

शासकीय द्वितीयावृत्ती इ.स. १९६३ मधील. या सर्व ठिकाणी द्वितीय चरणात 'एकांचे' असा सानुस्वार- पाठ आहे. म.शं. गोडबोले (सार्थ ज्ञानेश्वरी - इ.स. १९७७) हेही राजवाडे पाठाचेच अनुसरण करतात. त्यामुळे त्यांनीही 'एकांचे' असाच सानुस्वार पाठ घेतला आहे. मध्यंतरी शिवाजी विद्यापीठाने एकनाथपूर्वकालीन हस्तलिखितांवरून तयार केलेल्या पां.ना. कुलकर्णीसंपादित प्रतीतही (इ.स. १९९३) 'एकांचे' असाच सानुस्वार पाठ आहे.

मात्र कुंटे (प्रथमावृत्ती १८९४, संदर्भप्राप्त प्रतिरूप सहावी आवृत्ती २०००), साखरे (प्रथमावृत्ती १९४८, सं.प्राप्त चौदावी आवृत्ती १९८६), दांडेकर (प्रथमावृत्ती १९५३, सं.प्राप्त पाचवी आवृत्ती -१९७३), भिडे (प्रथमावृत्ती १९२८, सं.प्राप्त तिसरी आवृत्ती -१९५३) या (या वेळी माझ्या हाताशी असणाऱ्या) प्रतींत 'एकाचे' असा निरनुस्वार पाठ आहे. (माझ्या हाताशी आत्ता दोन पोथ्याही आहेत - गोंधळेकर १८९० व हिंद एजन्सी बुकसेलर्स -१९०८) यांमध्येही 'एकाचे' असाच निरनुस्वार पाठ आहे.

**३. (एकांचे / एकाचे ) - व्याकरणिक अर्थभेद**

एका अनुस्वारभेदामुळे काय फरक पडतो ? 'एक' हे संख्याविशेषण. ते एकवचनी (निरनुस्वार) असताना त्याचा सरळच 'एक' हा गणनावाचक निश्चितार्थ असतो. मात्र 'एकांचे' असा सानुस्वार प्रयोग अनेकवचनी व 'काही' असा अनिश्चितार्थक असतो. ज्ञानदेवीत विशेषणे विशेष्यनिघ्न असतात. त्यामुळे उक्त चरणात 'एकांचे' हे रूप 'गर्भवास' या पदाला अनुसरणारे पुं. अनेकवचनी ठरते. त्यामुळे 'काहींचे' (= वसुदेव - देवकींचे) हा मंग-केळ.कृत अर्थ संदर्भानुसारी व व्याकरणानुसारीही योग्य ठरतो. (मात्र ज्ञानदेवीत क्वचित अनुस्वार अकिंचितकरही असतो.)

**४. 'एकाचे' - निरनुस्वार रूपाचा अर्थ**

पूर्व परिच्छेदात आपण कुंटे, साखरे, दांडेकर, भिडे इत्यादी संपादक 'एकाचे' असा निरनुस्वार पाठ देतात, ही नोंद घेतलीच आहे. स्वाभाविकच 'एक' कोण, असा प्रश्न उपस्थित होतो. त्याचे उत्तर देताना हे सर्व संपादक, 'एक = अंबरीष' असा अर्थ देतात. (म.शं. गोडबोले हे 'एकांचे' असा सानुस्वार पाठ घेऊनही 'अंबरीषा'चा उल्लेख करतात. साखरे 'अंबरीष' ऐवजी 'अंबऋषी' असे म्हणतात.

**५. हा अंबरीष/अंबऋषी कोण?** -असा प्रश्न स्वाभाविकच निर्माण होतो. त्यासाठी संबद्ध संपादकांच्या टिपा लक्षात घेऊ. काही अन्य अभ्यासकांचीही मदत घेऊ.

दांडेकरांनी पुरवणीमध्ये काही पौराणिक कथानके दिली आहेत. त्यामध्ये प्रस्तुत (११.३५.२)चा संदर्भ म्हणून त्यांनी दिलेले कथानक सारांशरूपाने असे आहे -

'अंबरीष राजा दानशूर, पराक्रमी व भगवद्भक्त होता. एकदा द्वादशीस उपवास सोडण्याच्या वेळी दुर्वास ऋषी अतिथी म्हणून आले. राजाने त्यांचा सत्कार केला व नदीवर जाऊन आन्हिक उरकून भोजनास येण्याची विनंती केली. पण ते लवकर परत येईनात. इकडे द्वादशी अतिक्रांत होत आली. तेव्हा व्रतभंग होऊ नये म्हणून राजाने देवास नैवेद्य समर्पण केला व आपण केवळ तीर्थ प्राशन करून पारणे फेडले. दुर्वासांना हे कळले व त्यामुळे त्यांना मोठा राग येऊन त्यांनी आपल्या जटेतून एक कृत्या निर्माण केली व ती राजावर सोडली. शिवाय शापही दिला की, 'तू अनेक योनींत जन्म घेशील.' राजाचा नाश होणार हे जाणून भगवंतांनी सुदर्शनचक्र त्या कृत्येवर सोडले. कृत्येचा नाश केल्यावर ते चक्र दुर्वासांच्या मागे लागले. कुणीही देव त्यांचे त्या चक्रापासून संरक्षण करीना. भगवंतांनीही सांगितले की, 'तुम्ही राजाकडे जाऊन त्याची क्षमा मागा; तो तुमच्यासाठी उपाशी राहिला आहे.' तेव्हा एक वर्षाने दुर्वास राजाकडे परतले. तो उपाशी राहून अतिथीची वाट पाहातच होता. राजाने सांगताच दुर्वासांच्या पाठचे सुदर्शनचक्र सुटले. मग राजाने दुर्वासांसह आनंदाने भोजन केले अनेक योनींत जन्म हा दुर्वासांचा शाप अंबरीषाला बाधू नये म्हणून त्याच्यासाठी भगवंतांनी आपणच मत्स्यादी दहा अवतार घेतले. (दांडेकर -उक्त प्रत. पृ. ८३७) येथे लक्षात ठेवण्याची महत्त्वाची गोष्ट अशी की दांडेकर याच काय अन्य कथानकांचेही पौराणिक संदर्भ देत नाहीत.

साखरे यांच्या प्रतीतही परिशिष्टामध्ये काही पौराणिक कथानके येतात. तेथे प्रस्तुत (११.३५.२) या चरणाचा संदर्भ म्हणून अंबरीषाची कथा येते. ती प्रायः दांडेकरांनी दिल्याप्रमाणेच आहे. मात्र ते प्रस्तुत कथेचा संदर्भ देतात : भागवत स्कंध ९ अ. ४ ते ६, व महाभारत शांतिपर्व अ. १२४. यातील भागवती संदर्भ बरोबर आहे; परंतु महाभारतातील संदर्भ चुकला आहे. (अंबरीषाचे महाभारतातील संदर्भ - द्रोण. अ. ६४, शांति. अ. २९ व ९४ असे हवेत.) खरे म्हणजे साखरे यांनी दिलेले बहुतेक संदर्भ तपासूनच स्वीकारावे लागतात.

ज्ञानदेवीच्या अकराव्या अध्यायाची विद्यापीठीय आवृत्ती प्रा. भालचंद्र खांडेकर व प्रा.डॉ. लीला गोविलकर यांनी तयार केलेली आहे. (अनमोल प्रकाशन, पुणे, १९७९) या संपादकांनी टिपांमध्ये ही कथा (बहुतेक दांडेकरांच्या आधारे) अशीच दिली आहे. तेथे भागवताचा संदर्भ आहे. (मात्र तेथे 'नवम' ऐवजी 'दशम' स्कंध, असे चुकून पडलेले दिसते.)

'श्रीज्ञानेश्वरदर्शन' (भाग १) (इ.स. १९३४)मध्ये 'ज्ञानेश्वरीतील कथासंदर्भ' या नावाचा श्री. ना.मो. सोमण यांचा लेख आहे. त्यामध्ये ते प्रस्तुत (११.३५.२)

चरणाचा संदर्भ म्हणून अंबरीषाचीच कथा सांगतात. ती प्राय: दांडेकरांनी दिल्याप्रमाणेच आहे. मात्र ते तिचा (भागवत स्कंध ९ अ. ४-५) असा संदर्भ देतात.

स्वामी स्वरूपानंदांच्या 'अभंग ज्ञानेश्वरी'मध्ये (इ.स. १९७३) प्रस्तुत (११.३५) या ओवीचे रूपांतर असे आहे –

एकादशीव्रत । अंबरीषें केलें ।

तयाचे सोशिले । गर्भवास ॥ (११.७२)

स्वरूपानंदांनी शेवटी काही शब्दांचे स्पष्टीकरण देताना अंबरीषाची उपरोक्त कथा दिली आहे. मात्र त्यांनी तिचा संदर्भ दिलेला नाही.

ज्ञानदेवीनंतर सुमारे अडीचशे वर्षांनी लिहिल्या गेलेल्या 'गुरुचरित्रा'मध्ये दत्तावताराचे वर्णन करताना अंबरीष कथेचा उल्लेख येतो. (येथेही अंबरीषाचा 'अंबऋषी' असा उल्लेख ह्या ग्रंथकार करतो.) (गुरुचरित्र ३.७७)

प्रल्हाद कृष्ण प्रभुदेसाई ('देवीकोश' इ.स.१९६८ द्वितीयावृत्ती ऑक्टो. २००५) शक्तिपीठांच्या निर्मितीची पौराणिक कथा सांगताना अंबरीषाच्या कथेचा उल्लेख करतात. त्यांच्या निवेदनात दुर्वासाने अंबरीषाला शंभर योनींत जन्म घेण्याचा शाप दिलेला आहे. ते पुढे त्या शापांची वाटणी देताना विष्णूचे १०, शंकराचे १२, गणपतीचे १८ इत्यादी व उरलेले ५१ जन्म देवीने घेतले - असा उल्लेख करतात. हे ५१ जन्म हीच ५१ शक्तिपीठे असे ते सांगतात. त्यांनी भागवत स्कंध ९ असा संदर्भ दिलेला आहे. (अध्यायांचा उल्लेख नाही.) – (देवीकोश - द्वितीयावृत्ती -खंड १ - पृ. २७१-२७२) प्रभुदेसाईंनी मूळची भागवतीकथा देवीच्या पीठांना जोडली आहे. हा संदर्भ त्यांनी कुठून घेतला ते कळत नाही. (देवीकोशातील संदर्भ कसे दुय्यम दर्जाचे आहेत, हे यापूर्वी, कोशाच्या पहिल्या दोन भागांचे परीक्षण करताना, डॉ. स.अं. डांगे यांनी सोदाहरण दाखवून दिले आहे. ('जीवन-विकास' मे -१९६९)

आता अंबरीषाची भागवतातील कथा लक्षात घेऊ.

६. भागवती कथेत दुर्वास शाप नाही -

भागवताच्या स्कंध ९मध्ये अ. ४ ते ६ अंबरीषचरित्र येते. त्यातील येथे संबद्ध असलेला भाग अ.४ (श्लोक १५ ते ७१) व अ.५ (श्लोक १ ते २७) मध्ये आला आहे. त्यातील महत्त्वाचा तपशील (पुनरुक्त असला तरी) एकत्र करू.

अंबरीष हा ज्ञानसंपन्न व ऐश्वर्य संपन्न राजा परम विष्णुभक्त होता. तो दानशूर असून सर्व कर्मे तो ईश्वरार्पण बुद्धीने करीत असे. म्हणून प्रसन्न झालेल्या भगवंतांनी त्याला सद्भक्तांचे रक्षण करणारे व दुर्जनांचा नाश करणारे आपले सुदर्शनचक्र दिले होते.

एकदा एक वर्षपर्यंत त्याने साधनाद्वादशीचे व्रत केले. समाप्तीच्या वेळी कार्तिक महिन्यात त्याने द्वादशीपूर्वी त्रिरात्र उपोषण केले व द्वादशीस पारणे फेडण्यापूर्वी भगवंताची पूजा करून ब्राह्मणांना दाने दिली. त्यांची अनुज्ञा घेऊन तो पारणे फेडणार, तेवढ्यात तेथे दुर्वासमुनी आले. त्यांना पाहून राजाला आनंद झाला. त्यांचा योग्य सत्कार करून त्याने त्यांस भोजनाची विनंती केली. दुर्वासांनी ती मान्य करून ते आन्हिक आटोपण्यासाठी यमुना नदीवर गेले.

इकडे द्वादशी एकच घटका शिल्लक राहिली. तरीही दुर्वास आले नाहीत. आता पारणे न फेडले तर व्रतभंग होणार व फ़ेडले तर अतिथीस बोलावूनही त्याच्या आधी भोजन केल्यास त्याचा उपमर्द केल्याचा दोष लागणार, अशा पेचात अंबरीष सापडला, तेव्हा त्याने ब्राह्मणांचे मत घेतले व केवळ उदकप्राशन करून पारणे फेडले. नंतर तो दुर्वासांची वाट पाहात उपाशी बसून राहिला.

थोड्याच वेळात दुर्वास आले. राजाने त्यांचे स्वागत केले. परंतु राजाने पारणे फेडल्याचे त्यांना कळले. त्यामुळे ते संतापले. त्यांनी आपल्या जटेतील एक बट उपटली व तिच्यापासून प्रलयकालीन अग्नीप्रमाणे प्रखर अशी एक कृत्या निर्माण करून ती राजावर सोडली.

परंतु अंबरीष शांत बसून राहिला. विष्णूने त्याला संकटसमयी रक्षण करणारे सुदर्शनचक्र आधीच दिलेले होते. त्या चक्राने कृत्येस जाळून टाकले व ते चक्र दुर्वासाच्या मागे लागले. त्यामुळे घाबरलेला दुर्वास दशदिशांना पळत सुटला. त्या चक्रापासून सुटका मिळावी म्हणून तो ब्रह्मादी देवांना शरण गेला. परंतु त्यांनी आपली असमर्थता व्यक्त करून त्यास भगवान विष्णूलाच शरण जाण्यास सांगितले.

दुर्वास विष्णूला शरण गेले. विष्णू म्हणाले, 'तू राजालाच शरण जाऊन त्याची क्षमा माग.' तेव्हा दुर्वास अंबरीषाकडे परत आले. या गडबडीत एक वर्ष उलटून गेले. तरीही अंबरीष दुर्वासांची वाट पाहात उपाशी बसून होता. दुर्वासांच्या विनंतीनुसार राजाने सुदर्शनाची प्रार्थना केली व त्याच्यापासून दुर्वासांना मुक्त केले.

(सार्थ श्रीमद्भागवत - भाग ६ -यंदेप्रत इ.स. १९२७)

आपण दांडेकरांनी दिलेली कथा नोंदवलीच आहे. ती परत पाहिल्यानंतर तपशिलांचे सूक्ष्म भेद लक्षात येतील. परंतु महत्त्वाचा भेद असा की, दुर्वासांनी राजाला विविध योनींमध्ये जन्म घेण्याचा शाप दिला व तो त्यास बाधू नये म्हणून भगवंतांनी तो स्वत:कडे घेऊन तदनुसार मत्स्यादी दहा अवतार घेतले - *ही घटना भागवती कथेत नाही.* जर ती असती तर पौराणिक कोशांनी तिचा उल्लेख केला असता. हे पडताळून पाहण्यासाठी आता काही कोशांची साक्ष काढू.

७. कोशांची साक्ष - दुर्वासशापाची घटना भागवती कथेतच काय पण अन्यत्रही नाही, हे लक्षात घेण्यासाठी आता या परिच्छेदामध्ये पौराणिक कथासंदर्भ देणाऱ्या चार महत्त्वाच्या कोशांची नोंद करावयाची आहे. ते कालानुक्रमे असे -

(१) भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश - र. भा. गोडबोले (१९२८)

(२) भारतीय पौराणिक कोश (भागवताच्या यंदे प्रतीला जोडलेला (१९२९)

(३) भारतवर्षीय प्राचीन चरित्र कोश - म.म. सिद्धेश्वर शास्त्री चित्राव. (हिंदी आवृत्ती - १९६४)

(४) पुराणिक एन्सायक्लोपीडीया - वेट्टम मणी (मूळ मळयालम् आवृत्ती १९६४. इंग्रजी : १९७५ सं.प्राप्त. इंग्रजी प्रतीचे आठवे पुनर्मुद्रण २००२)

हे सर्व कोशकर्ते 'अंबरीष' या शब्दावर संदर्भटीप देताना उपरोक्त भागवती कथाच सांगतात. स्वाभाविकच त्यांच्या नोंदींमध्ये मूळ भागवतात नसलेली दुर्वासशापाची घटना येत नाही.

अंबरीषाचा उल्लेख भागवताशिवाय अन्यत्रही येतो. या कोशकर्त्यांनी त्याची दखल घेतलेली आहे. मात्र तेथे क्वचित पत्ता चुकला आहे. जसे -

गोडबोल्यांनी महाभारतातील संदर्भ देताना - (शांतिपर्व अ - १२४) असा दिला आहे. तेथे - (द्रोण. अ. ६४ व शांति. अ. २९ व ९४) असे पत्ते हवेत.

चित्रावशास्त्र्यांनी पद्मपुराणातील संदर्भ दिला आहे - (पद्म. उत्तरखंड - अ. ३८ - श्लोक २६-२७) माझ्या हाताशी आता पद्मपुराणाची जी कलकत्ता प्रत (१९५८) आहे. तीमध्ये अंबरीषाचा उल्लेख उत्तर. ३८-८८ मध्ये आहे, तो एवढाच–

अंबरीषादयः सर्वे ये भक्ता भुवि विश्रुताः ।
द्वादशीं साधयित्वा तु ते गता विष्णुसद्मनि ॥

येथेही दुर्वासशापाचा उल्लेख नाही.

वेट्टम मणी यांनी अंबरीषाचे महाभारतात येणारे सर्व उल्लेख दिले आहेत. ते सर्व तपासून पाहिले. त्यांपैकीही कोणत्याच ठिकाणी दुर्वासशापाचा व तदनुसारी विष्णूच्या दहा अवतारांचा उल्लेख नाही.

८. कवींची साक्ष - कोशकर्त्यांच्या साक्षीला पूरक असणारी दोन कवींची साक्ष आता काढू. यांपैकी पहिले - मोरोपंत (इ.स. १७२९ ते १७९४). त्यांच्या स्फुट काव्यांमध्ये 'भक्तभूषण' (भाग - २ - इ.स. १९६२) व 'अंबरीषाख्यान' (भाग- ३ - इ. स. १९६४) या नावांचे मूळ भागवती कथेचे दोन अनुवाद आहेत. (मोरोपंत हे मूळ काव्याशी इमान राखणारे प्रामाणिक अनुवादक कसे आहेत, हे प्रस्तुत लेखकाने 'आर्याभारत : नवदर्शन' ग्रंथात (१९९७) सोदाहरण दाखवून दिले आहे.) या दोन्ही

अनुवादांमध्ये मोरोपंत मूळ भागवती कथाच जशीच्या तशी सांगतात. स्वाभाविकच त्यांच्या या काव्यांमध्ये मुळात नसलेला दुर्वासशाप नाही.

दुसरे कवी - स्वामी सत्यदेवानंद सरस्वती. हे गेल्या शतकातले. त्यांचा 'अंबरीषाख्यान'नामक ओवीबद्ध अनुवाद 'प्रसाद' मासिकात (फेब्रु. १९६७) प्रसिद्ध झालेला आहे. या अनुवादाच्या शेवटी शके १८८७ (म्हणजे इ.स. १९६५) असा कालोल्लेख आहे. सापेक्षतः अर्वाचीन असणाऱ्या या अनुवादातही दुर्वासशाप व तदनुसारी विष्णूचे दहा जन्म - या घटनांचा उल्लेख नाही.

येथवरच्या शोधयात्रेत काय निष्पन्न होते ? एक म्हणजे – ज्ञानदेवांना 'एकांचे गर्भवास...'मध्ये 'अंबरीष' अभिप्रेत नाही. स्वाभाविकच मंगरूळकर – केळकरांचा प्रस्तुत चरणाचा - एकांचे (=वसुदेव-देवकींच्या बाबतीतले) हा अनुवाद योग्य ठरतो. दुसरे म्हणजे अंबरीषाच्या भागवती कथेत दुर्वासशाप नाही. मग दांडेकरादी संपादकांनी ही शापकथा कुठून आणली, हा प्रश्न शिल्लक राहतोच. मला त्याचे उत्तर मिळालेले नाही.

९. हे कोडे एवढ्यावरच संपत नाही. कारण ज्ञानदेवांपासून रामदासांपर्यंतच्या संतसाहित्यात (प्रायः अभंगांमध्ये) दुर्वासशाप व अंबरीष (वा अंबऋषी) दृष्टांतादाखल येतात. भगवंत आपल्या भक्तांचे संरक्षण कसे करतो ते सांगताना सर्वांगीण अन्य पौराणिक दृष्टांतांच्या बरोबरीनेच अंबरीषाची कथा उल्लेखिली आहे. त्यांपैकी काही ठळक असे -

ज्ञानदेव – अंबऋषीकारणें गर्भवास साहिले । (सकलसंतगाथा क्र.३३२)

नामदेव - १. अंबऋषीकारणें । दहा वेळ गर्भवासा येणें ।। (शासकीय गाथा क्र. ४७६)

२. अंबऋषीरायास पडले सायास ।
साहिला गर्भवास सकळ देवें ।। (क्र. ४७६)

३. अंबऋषीसाठीं जन्म सोशियले । (क्र.१४१६)

जनाबाई - १. त्याचे गर्भवास सोसले ।
कष्टी होतां अंबऋषी ।। (सकल. क्र. १०६)

२. मग अंबऋषीसाठीं पडियेला संकटीं ।
मच्छ झाला पोटीं समुद्राच्या ।। (क्र. ३४१)

कान्होपात्रा - अंबऋषीसाठीं । जन्म घेतले जगजेठी । (सकल क्र. ११)

एकनाथ - १. अंबऋषीरायास पडिले सायास ।
सोसी गर्भवास स्वयें देव ।। (सकल. क्र २२०१)

२. अंबऋषीसाठीं गर्भवास सोसी ।
परीक्षितासी रक्षीं गर्भामाजीं ।। (क्र. २२२८)

३. ज्ञानाभिमान दुर्वासासी ।
म्हणोनि शापी अंबऋषी ।। (क्र. २३२३)

४. द्वादशीच्या ग्रासोग्रासीं । तृप्ति होय यज्ञपुरुषीं ।
तें फळ लभलें अंबऋषी । गर्भवासी देव पैं आला ।।
(क्र. ३३६५)

तुकाराम - अंबऋषीकारणें ।
जन्म घेतले नारायणें ।। (शासकीय गाथा क्र. १५००)

रामदास - तया अंबऋषीकारणें ।
दहा जन्म येणेंजाणें ।। (भक्तिपंचक-क्र. ४) (समर्थ ग्रंथभांडार)

हे काही संदर्भ अभंगवाङ्मयातील. आता एकनाथांच्या भागवत टीकेतील एक संदर्भ नोंदू. तो असा -

अंबरीषाचे गर्भवास ।
म्यांचि सोशिले सावकाश ।
उणें आपुल्या निजभक्तांस ।
ऋषीकेशी येवों नेदी ।। (ए.भा. १६.३१६)

मूळ-भागवत (११.१६.४४) वरील टीकेत एकनाथांनी हा दृष्टांत दिला आहे. मूळ श्लोकात त्याचा उल्लेख नाही.

या सर्व संदर्भांमध्ये अंबरीषाचा उल्लेख बऱ्हंशी 'अंबऋषी' असा आला असल्यामुळे हा कुणी वेगळा असावा काय, अशी शंका येणे शक्य आहे. परंतु तिला जागा नाही. कारण एकतर अंबऋषी ऐवजी 'अंबरीष' असाही उल्लेख एकनाथांनी केला आहे. दुसरे असे की, नामदेव व एकनाथ यांच्या अभंगानं अंबऋषीला 'राय' (=राजा) म्हटले आहे. तिसरे असे की, संतांपैकी, नामदेव, एकनाथ (एकनाथी भागवत) व तुकाराम यांच्या साहित्यातील शब्दार्थ – संदर्भ देणारे कोशकर्ते - डॉ. मु.श्री. कानडे व श्री. रा.शं. नगरकर अंबरीष हाच अंबऋषी असल्याची नोंद करतात. चौथी गोष्ट अशी की, 'अंबऋषी' नामक कुणाही ऋषीचा उल्लेख पुराणांमध्ये नाही. त्यामुळे हे दुर्वासशापाचे कोडे अनुत्तरितच राहते.

या सर्व शोधयात्रेच्या शेवटी असे वाटू लागते की, अंबरीषाच्या मूळ भागवती कथेत जरी दुर्वासशाप व तदनुसारी विष्णूचे दहा अवतार या घटनांचा उल्लेख नसला तरी संतांनी भक्तिविवेचनार्थ दृष्टांत म्हणून या घटना सांगितल्या असाव्यात काय?

कारण अशा प्रकारे मूळ पौराणिक दृष्टांत बदलणे वा त्यात भर घालणे, ही बाब संत साहित्यात काही नवीन नाही.

अर्थात याविषयी काही निष्कर्ष काढण्याची घाई न करणेच बरे. अजूनही कुणीतरी दुर्वासशापाचा संदर्भ शोधून काढील, अशी मला आशा आहे.

■

मु. व पोस्ट - चौल, ता. अलिबाग, जि. रायगड. 402203.
दूरध्वनी : ९५२१४१-२४०३६२

---

**निवेदन**

## 'परामर्श'

'परामर्श' हे तत्त्वज्ञानविषयक त्रैमासिक पुणे विद्यापीठाच्या तत्त्वज्ञान विभागातून गेली २५हून अधिक वर्षे नियमितपणे प्रकाशित केले जात आहे. परामर्श (हिंदी) व इंडियन फिलॉसॉफिकल कार्टरली ही अनुक्रमे हिंदी व इंग्रजी भाषेतील त्रैमासिकेही दीर्घकाळ प्रकाशित होत आली आहेत. तीनही त्रैमासिकांचे पूर्वप्रकाशित अंक बहुसंख्येने उपलब्ध आहेत. जिज्ञासू वाचकांपर्यंत हे अंक पोहोचण्यासाठी पुणे विद्यापीठाने हे संच अत्यल्प दरात विकण्याचे ठरविले आहे. 'प्रथम मागणी करणाऱ्यास प्रथम' या तत्त्वावर साठा संपेपर्यंत किंवा ३१ ऑगस्ट २००७ पर्यंत हे संच तत्त्वज्ञान विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ७ येथे दुपारी १ ते ४ या वेळेत उपलब्ध होतील. संचांचे दर :

परामर्श (मराठी) खंड १ - २५ मधील उपलब्ध अंक रु. ५००/-
परामर्श (हिंदी) खंड १ - २५ मधील उपलब्ध अंक रु. ५००/-
इंडियन फिलॉसॉफिकल कार्टली (इंग्रजी)
खंड १ - ३० मधील उपलब्ध रु. १,०००/-

टपालाने अंक मागवल्यास रु. ८००/- अधिक पडतील. एकत्रित रकमेचा डिमांड ड्राफ्ट 'रजिस्ट्रार, पुणे विद्यापीठ' या नावाने काढावा व तो विभागप्रमुख, तत्त्वज्ञान विभाग, डॉ. आंबेडकर भवन, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७ या पत्त्यावर पाठवावा.

# भर्तृहरी आणि सोस्यूरच्या भाषाविषयक विचारांतील काही साम्यस्थळे*

रेणुका ओझरकर

: १ :

ज्ञानग्रहण आणि संदेशाची देवाण-घेवाण या दोन्ही क्रिया भाषेमार्फत होतात. भाषेच्या अनेक कार्यांपैकी ही दोन कार्ये होत. भाषा ही कार्ये कशी पार पाडते ? भाषेची रचना कशी आहे ? या कार्यासाठी भाषेचा वापर करणाऱ्या मानवी मनाची रचना कशी आहे ? भाषेमार्फत आपल्या आसपासच्या वास्तवाशी माणूस कसा जोडला जातो ? असे काही महत्त्वाचे प्रश्न आधुनिकच नव्हे तर प्राचीन विचारवंतांनासुद्धा पडलेले आहेत. मग ते विचारवंत पौर्वात्य असोत किंवा पाश्चात्य.

प्राचीन भारतीय परंपरेत, व्याकरणशास्त्र, तत्त्वज्ञान आणि काव्यशास्त्र अशा विविध क्षेत्रांतील विचारवंतांनी भाषाविषयक विचार मांडले आहेत. त्या त्या क्षेत्रातील अभ्यासाचा मध्यवर्ती विषय, चर्चिले जाणारे प्रश्न त्यांचे स्वरूप इत्यादींनुसार भाषेकडे बघण्याचा त्या त्या विचारवंतांचा दृष्टिकोण वेगळा होता. ढोबळमानाने, दोन दृष्टिकोणांचा विचार करता येईल :

(१) भाषा हाच मध्यवर्ती अभ्यासविषय आहे असा दृष्टिकोण. अशा अभ्यासात भाषेचा अभ्यास हेच साध्य (एण्ड) मानले आहे. भाषेच्या रचनेविषयी, व्याकरण आणि उत्पत्तीविषयीची चर्चा या अभ्यासात होते.

(२) दुसरा दृष्टिकोण असा, की भाषा हे संदेशन आणि ज्ञानग्रहणाचे माध्यम असल्याने भाषेचा अभ्यास संदेशन आणि ज्ञानग्रहणाविषयी अधिक जाणून घेण्यासाठी केला पाहिजे. माणूस भाषेमार्फत आसपासच्या वास्तवाशी कसा जोडला जातो ? त्या वास्तवाचे ज्ञान त्याला भाषेद्वारा कसे होते ? इत्यादी प्रश्नांचा विचार या प्रकारच्या अभ्यासात होतो. थोडक्यात, भाषाभ्यास हे

* प्रस्तुत लेख हा प्राच्य विद्या संशोधन मंडळ, ठाणे यांनी डिसेंबर २००५मध्ये आयोजित केलेल्या 'इंडियन काँट्रिब्युशन टु वर्ल्ड सिव्हिलायझेशन' या विषयावरील सेमिनारमध्ये वाचलेल्या निबंधाचा अनुवाद आहे.

अभ्यासाचे अंतिम साध्य नसून संबंधित प्रश्नांच्या अभ्यासाचे साधन (मीन्स टु ॲन एण्ड) आहे असे मानले जाते.

भारतीय परंपरेच्या संदर्भात, पहिला दृष्टिकोण पाणिनीय व्याकरणपरंपरेचे वैशिष्ट्य आहे. दुसरा दृष्टिकोण काव्यशास्त्रज्ञ आणि दार्शनिकांनी (वेदान्ती, न्यायवैशेषिक इ०नी) बाळगलेला दिसून येतो.

हे दोन्ही दृष्टिकोण प्रथमच एकत्र आलेले दिसतात, ते भर्तृहरीच्या (इ.स.पाचवे शतक) 'वाक्यपदीय' या ग्रंथात. भर्तृहरीच्या व्याकरणिक चर्चेला वेदान्त तत्त्वज्ञानाचे अधिष्ठान आहे. त्याने विभक्ती-कारके, शब्द, वाक्य, पुरुष, क्रिया, काल, जाति अशा व्याकरणिक संज्ञांचा विचार करताना तत्त्वज्ञानाचीही जोड दिलेली आहे. त्याचबरोबर, मानव-भाषा-वास्तव यांचे नाते, संकल्पनांची निर्मिती व ग्रहण, संदेशन यांचाही त्याने विचार केलेला दिसतो. ''सुट्या सुट्या ध्वनींच्या साखळीमार्फत आपल्याला संपूर्ण शब्दाचे ग्रहण कसे होते, या प्रश्नाला व्याकरणाच्या दृष्टीतून दिलेले उत्तर म्हणजे भर्तृहरीचा स्फोटवाद होय.'' (सुब्रमणिय अय्यर, १९६९, पृ. १६०). हा प्रश्न ग्रहणशक्तीशी (पर्सेप्शन) संबंधित आहे.

आज, भाषेमार्फत होणाऱ्या संदेशन आणि ज्ञानग्रहण यांच्या अभ्यासाला अधिकाधिक महत्त्व येत आहे. त्या संदर्भात भर्तृहरीच्या भाषेविषयीच्या दृष्टिकोणाची नोंद घेणे आवश्यक आहे. आजच्या काळातील चर्चा, अभ्यासाच्या नव्या दिशा, नवे प्रश्न व समस्या तसेच इतर पाश्चात्य व पौर्वात्य विद्वानांचे विचार यांच्या संदर्भात भर्तृहरीचे स्थान निश्चित करणे गरजेचे आहे. भर्तृहरीची इतर विचारवंतांशी केलेली तुलना या दिशेने पहिले पाऊल ठरू शकेल.

प्रस्तुत लेखात भर्तृहरीच्या भाषाविषयक विचारांतील आणि फर्डिनांड द सोस्यूर (१८५७-१९१३) यांच्या भाषासिद्धांतातील काही निवडक साम्यस्थळे दाखवण्याचा प्रयत्न केला आहे. सोस्यूर हा आधुनिक भाषाशास्त्र आणि चिन्हमीमांसा यांचा जनक होय. तो संस्कृतचाही अभ्यासक होता. सोस्यूर भाषेकडे चिन्हव्यवस्था (सिस्टिम ऑफ साइन्स) म्हणून पाहतो. त्याच्या 'चिन्ह' या संकल्पनेची भर्तृहरीच्या 'स्फोट' संकल्पनेशी तुलना करता येईल.

सोस्यूरच्या मते, भाषा ही समाजातील अनेक चिन्हव्यवस्थांपैकी एक आहे. इतर चिन्हव्यवस्था म्हणजे दृक्‌कला, सांस्कृतिक व धार्मिक विधी इत्यादी होत. भाषाव्यवस्थेची रचना आणि प्रक्रिया जाणून घ्यायची असल्यास इतर चिन्हव्यवस्थांचाही विचार करणे उपयुक्त ठरते. या सर्व चिन्हव्यवस्थांचा विचार एकाच शास्त्रात करता येईल, असे त्याचे मत होते. सोस्यूरने अशा सर्वसमावेशक शास्त्राची शक्यता वर्तविली

आणि त्या शास्त्रालाच त्याने चिन्हमीमांसा (सेमिऑलजि) असे संबोधले. भाषाशास्त्र हे या दृष्टीने पाहता, चिन्हमीमांसेचीच एक शाखा ठरते (सोस्यूर, १९१६, पृ. १६).

सोस्यूरप्रमाणेच भर्तृहरीच्या भाषाविषयक विचारांमध्येही विविध क्षेत्रांना एकत्र आणण्याची क्षमता आहे. आनंदवर्धन या आलंकारिकाने भर्तृहरीच्या 'ध्वनि' संकल्पनेचा वापर करताना हीच क्षमता ओळखली असावी. माझ्या मते, आजच्या संदर्भात, भर्तृहरीच्या विचारांकडे बहुज्ञानशाखीय दृष्टिकोणातून पाहण्याची गरज आहे. त्याची सुरुवात म्हणून भर्तृहरी आणि सोस्यूरची प्राथमिक पातळीवर तुलना करण्याचा येथे प्रयत्न केलेला आहे. तसे करताना, पुढील चार साम्यस्थळांचा विचार केला आहे :

(१) स्फोटवाद आणि सोस्यूरची 'चिन्ह' ही संकल्पना.

(२) शब्द व अर्थाचा नित्यसंबंध आणि चिन्हक व चिन्हित यांचा परस्परसंबंध.

(३) वाणीचे चार प्रकार आणि सोस्यूरने केलेला भाषाव्यवस्था व भाषेचा वापर यांच्यातील भेद

(४) शब्दब्रह्म आणि सोस्यूरचा पूर्णवादी (होलिस्टिक) दृष्टिकोण.

या बाबींचा विचार करताना माझे क्षेत्र वाक्यपदीयाच्या 'ब्रह्मकाण्डा'पुरतेच मर्यादित ठेवले आहे. यामागचे एक कारण असे की, याच म्हणजे पहिल्या काण्डात भर्तृहरीने आपल्या स्फोट आणि शब्दब्रह्म या महत्त्वाच्या संकल्पनांची ओळख करून दिलेली आहे. (साम्यस्थळे का आहेत, ती काय सुचवतात, याविषयीसुद्धा निष्कर्ष घाईने काढण्याचा प्रयत्न केलेला नाही, कारण अशा निष्कर्षांप्रत येण्यासाठी अधिक सखोल अभ्यासाची गरज आहे.)

तुलनेकडे वळण्याआधी हेही लक्षात घ्यायला हवे की, या दोघाही विचारवंतांच्या संकल्पना 'सारख्या' असल्या तरी 'एकच' नव्हेत. कारण, कोणतीही संकल्पना तिच्या मूळ सिद्धांताच्या संदर्भातच बघणे आवश्यक असते.

: २ :

(१) पूर्वी म्हटल्याप्रमाणे, 'भर्तृहरीचा 'स्फोटवाद' म्हणजे शब्द ग्रहण कसा होतो, या प्रश्नाचे व्याकरणिक उत्तर आहे. 'स्फोट' हा शब्द √स्फुट् = फुटणे, अकस्मात प्रकट किंवा व्यक्त होणे या संस्कृत धातूपासून तयार झाला आहे.

स्फोटवादाची चर्चा 'वाक्यपदीय'च्या १.४४ व्या श्लोकापासून सुरू होते (सुब्रमणिय अय्यर, १९६९, पृ. १५७). या ठिकाणी दोन प्रकारच्या शब्दांचा उल्लेख केलेला आहे : एक शब्द जो अर्थवाही आहे, आणि दुसरा जो हा पहिल्या प्रकारचा शब्द व्यक्त करतो (वाक्य. १.४४). दुसऱ्या प्रकारचा शब्द इंद्रियांना ग्राह्य आहे, आणि सुट्या सुट्या ध्वनींच्या साखळीने बनलेला आहे. हा शब्द म्हणजे 'ध्वनिशब्द'

होय. पहिल्या प्रकारचा, ध्वनिशब्दाने प्रकट होणारा, अर्थवाही शब्द म्हणजे स्फोटशब्द होय. स्फोटामध्ये शब्दाचे रूप ('शब्दाकृति') आणि त्या रूपाने सूचित होणारी संकल्पना (कन्सेप्ट) किंवा अर्थ यांचे परस्परसाहचर्य असते (वाक्य. १.५०) जेव्हा स्फोट अकस्मात आणि पूर्णपणे व्यक्त होतो, तेव्हा शब्दाचे रूप आणि संकल्पना (शब्द आणि अर्थ) दोन्ही एकाच वेळी व्यक्त होतात.

सोस्यूरच्या मते, भाषिक चिन्ह हा भाषाव्यवस्थेचा मूळ घटक आहे. भाषिक चिन्ह (लिंग्विस्टिक साइन) म्हणजेच चिन्हक (सिग्निफाइड) आणि चिन्हित (सिग्निफायर) किंवा शब्दाचे ध्वनिरूप व त्याने व्यक्त होणारी संकल्पना यांचे नित्यसाहचर्य असणारा घटक (असोशिएटिव्ह होल). या दोघांचा परस्परसंबंध नित्य आहे. ''या दोन्ही घटकांचा फार घट्ट संबंध आहे, आणि त्यातील एकाने दुसऱ्या घटकाचा निर्देश होतो...'' (सोस्यूर१९१६, पृ. ६६). चिन्हक व चिन्हित या दोन्ही मानसिक संकल्पना आहेत. त्या 'जाति' (युनिव्हर्सल किंवा टाइप) आहेत, 'व्यक्ति' (पर्टिक्युलर किंवा टोकन) नव्हेत.

भर्तृहरीच्या मतेदेखील, शब्द आणि अर्थ हे कायमस्वरूपी किंवा नित्य आहेत. शब्द आणि अर्थ हे केवळ जातिरूपातच नित्य असू शकतात. व्यक्ती नेहेमीच क्षणभंगूर, अनित्य असतात. भाषिक चिन्हाप्रमाणेच स्फोटशब्दसुद्धा मानसिक संकल्पना आहे. त्याला बुद्धिस्थ शब्द असे म्हटले आहे.

| | |
|---|---|
| स्फोटशब्द | अर्थजाति |
| | शब्दजाति |

भर्तृहरीचा 'स्फोटशब्द'

| | |
|---|---|
| चिन्ह | चिन्हित |
| | चिन्हक |

सोस्यूरचे भाषिक चिन्ह

(२) शब्द आणि अर्थ यांच्याप्रमाणे त्यांचा परस्परसंबंधही नित्य आहे (वाक्य. १.२३). वैशेषिकांनी असे मानले आहे की, हा परस्परसंबंध रूढीने निश्चित होतो. काव्यशास्त्रपरंपरेत यालाच 'साक्षात्संकेत' असे म्हणतात. आणि म्हणूनच व्यक्त होणारा मुख्यार्थ हा साक्षात्संकेतितार्थ असतो. भर्तृहरी रूढी हे शब्दार्थसंबंधाचे कारण मानत नाही. कारण, रूढीसाठी तिचा कर्ता अभिप्रेत असतो. 'कोणीतरी' हा संबंध रूढ करावा लागतो. शिवाय, असा संबंध रूढ होण्यापूर्वी काय होते, एकाएकी हा संबंध रूढ कसा काय झाला, असे प्रश्न पाठोपाठ उपस्थित होतात व त्यांची उत्तरे मिळणे अशक्य आहे. शब्दार्थांचा संबंध एका क्षणी अचानक प्रस्थापित होणे याचाच अर्थ हा संबंध नित्य नाही असा होतो. परिणामी, स्फोटसुद्धा अनित्य ठरतो. त्यामुळे, शब्दार्थसंबंध

'रूढी'ने प्रस्थापित झालेला नसून तो नित्यच आहे, असे मानणे भाग आहे.

सोस्यूरच्या मते मात्र, चिन्ह हे यादृच्छिक (आर्बिट्ररी / अनमोटिव्हेटिड) तसेच रूढीने चालत आलेले असते (सोस्यूर१९१६, पृ. ६७) किंबहुना चिन्हक-चिन्हिताचा संबंध यादृच्छिक असल्यामुळेच तो संबंध फक्त रूढीच्या बंधनानेच टिकून राहतो. या चालत आलेल्या रूढीमुळेच एखाद्या चिन्हाला एका विशिष्ट समाजात, एका विशिष्ट कालखंडात नित्यत्व लाभते व हे नित्यत्व सापेक्ष असते. ही रूढी समाजातील ती भाषा बोलणाऱ्या लोकांच्या साधारण संमतीने प्रस्थापित होते आणि चालू राहते.

वरकरणी पाहता या मुद्यावर दोघा विद्वानांचा विचार वेगवेगळा आहे असे वाटते. पण ते खरे नाही. सोस्यूरने म्हटले आहे की, बोलणाऱ्यांच्या एका पिढीपुरते पाहता, शब्दार्थसंबंध नेहेमीच आधीच्या पिढीकडून चालत येतो. ''...भाषा म्हणजे नेहेमीच मागच्या काळातून चालत आलेला वारसा असते...'' (सोस्यूर, १९१६, पृ. ७४). साधारणपणे वक्ता या संबंधाबद्दल समाधानी असतो, त्यामुळे आपल्या भाषेत स्वतःहून टोकाचे बदल तो घडवून आणत नाही. यालाच सांस्कृतिक व सामूहिक स्थितिशीलता (कलेक्टिव्ह इनर्शिआ) म्हणतात. त्यामुळे भाषिक चिन्ह सापेक्षतेने नित्य असते.

भर्तृहरीची नित्यत्वाची कल्पना काहीशी अशीच आहे. स्फोटशब्द नित्य आहे, कारण त्याच्या उगमाचा शोध घेता येत नाही तसेच त्याचा अंतही जाणता येत नाही. हा संबंध सतत पुढे चालू राहतो, त्यामुळे तो प्रवाहनित्य (वाक्य. १.२८) आहे.

(३) स्फोटशब्द हा बुद्धिस्थ शब्द आहे. संदेशन होण्यासाठी तो सार्वजनिक व्हावा लागतो. त्याला सार्वजनिक पातळीवर आणण्याचे काम इंद्रियग्राह्य, अनित्य असा ध्वनिशब्द करतो. वक्त्याच्या दृष्टीने पाहता त्याच्या मनातील स्फोट ध्वनिमार्फत व्यक्त होतो, तर श्रोत्याच्या दृष्टीने, त्याने ऐकलेल्या ध्वनिशब्दाने त्याच्या मनातील अव्यक्त, अप्रकट स्फोट जागृत होतो. संदेशनातील या क्रिया पुढील आकृतीद्वारे दाखवता येतील. (व्यक्तीकरणाच्या या प्रक्रियेत वाणीचे चार प्रकार किंवा टप्पे असतात, त्यांची चर्चा पुढे येईलच.)

संदेशनाच्या क्रियेत चिह्नक आणि चिह्नित एकमेकांना कसे व्यक्त करतात, हे सोस्यूरने 'स्पीच सर्किट'च्या रूपात दाखवले आहे. (आकृती पुढील पानावर)

एक लक्षात घ्यायला हवे की, भर्तृहरीच्या संदेशनक्रियेत संपूर्ण ध्वनि व स्फोटाचा विचार केला आहे, तर सोस्यूरने दाखवलेल्या क्रियेत एका चिन्हातील घटक चिन्हक-चिन्हिताचा विचार केला आहे. (त्यादृष्टीने सोस्यूरने चिन्हांतर्गत प्रक्रिया दाखवली आहे असे म्हणता येईल काय ?)

(४) भर्तृहरीने ज्यांचा विचार केला आहे त्या वाणीच्या चार प्रकारांचा उल्लेख




वक्ता

भर्तृहरीचा संदेशनक्रिया

सोस्यूरचे स्पीच सर्किट

प्रथम ऋग्वेदात येतो. या चार प्रकारांमधील 'परा वाक्' ही सर्वश्रेष्ठ आहे. भर्तृहरीच्या मते ही वाणी म्हणजेच शब्दब्रह्म होय. सर्व मानवांमध्ये असणारी भाषा किंवा भाषिक क्षमता म्हणजे परा वाणी. याउलट, वैखरी म्हणजे सार्वजनिक पातळीवरची, श्रोत्यांना इंद्रियग्राह्य असणारी, पूर्णपणे व्यक्त झालेली वाणी होय. या दोन वाणींच्या मध्ये मध्यमा आणि पश्यन्ती या वाणी असतात. (काही वेळा परा वाणीचा उल्लेख वगळून भर्तृहरी केवळ तीनच प्रकार मानतो.)

सोस्यूरने अमूर्त अशी भाषाव्यवस्था आणि भाषाव्यापार यांच्यामध्ये भेद केलेला आहे. अमूर्त भाषाव्यवस्थेला त्याने 'लांग' म्हटले, तर भाषाव्यापाराला 'परोल'. एकच विशिष्ट भाषा बोलणारे दोन वक्तेसुद्धा कधीच पूर्णपणे एकमेएकांसारखे बोलत नाहीत. प्रत्येकाची आपापली एक भाषा असते. एकच वक्तादेखील सर्ववेळ सारखीच भाषा बोलत नाही. भाषेच्या अशा सर्व रूपांना 'परोल' म्हणता येईल. असे असले, तरी प्रत्येकाच्या या वेगवेगळ्या 'भाषा' प्रत्यक्षात एकाच भाषेची रूपे असल्याचे आपण ओळखतो (उदा० मराठी, हिंदी) याचे कारण म्हणजे त्यांची 'एकच' असलेली संरचना व व्यवस्था. त्या व्यवस्थेलाच 'लांग' म्हणता येते. लांग सामाजिक आहे, तर परोल व्यक्तिगत. सोस्यूर या दोहोंव्यतिरिक्त सर्व मानवांमध्ये असणाऱ्या भाषिक क्षमतेचाही विचार करतो आणि तिला 'लंगाज' असे संबोधतो.

पुढील तक्त्यामध्ये स्फोट-ध्वनि यांच्या पातळ्या, तसेच वाणीचे चार प्रकार व सोस्यूरचे त्रिस्तरीय वर्गीकरण यांची तुलना दाखवली आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १. परा वाक् | जन्मत:च लाभलेली क्षमता. मानवामध्ये परेचे असणे हे त्याच्या पूर्वजन्मांतील कर्मांचे फल मानले जाते. ही परा वाक् म्हणजेच शब्दब्रह्म. | या पातळीवर स्फोट अमूर्त, अप्रकट असतो, केवळ एक शक्यता म्हणून त्याचे अस्तित्व असते. | सोस्यूरच्या संदर्भात हिची तुलना लंगाजशी करता येईल. |
| २. पश्यन्ती | विशिष्ट भाषेची वक्त्याने आत्मसात केलेली व्यवस्था. हिचा उगम 'परे'तच असतो. | स्फोट अव्यक्तच असतो. शब्द-अर्थ एकत्रच असतात, त्यांच्यात कोणताही भेद नसतो. | लांग, भाषाव्यवस्था. |
| ३. मध्यमा | भाषेच्या व्यक्तीकरणाची प्रक्रिया सुरू होते, पण भाषा उच्चारली जात नाही. याच 'मध्यमा' वाणीत स्वत:शी विचार केला जातो. | शब्द-अर्थ यांच्यात सूक्ष्म भेद. हा भेद वक्त्याच्या बोलण्याच्या इच्छेचा परिपाक असतो. | ? |
| ४. वैखरी | पूर्णपणे व्यक्त झालेली वाणी. श्रोतृग्राह्य. वक्त्याच्या मुखात जागृत झालेला वायू विविध अवयवांना (जिव्हा, तालु इ.) स्पर्श करतो, म्हणून ती व्यक्त होते. | श्रोत्याला ऐकू येतो तो ध्वनिशब्द. सुट्या ध्वनींची शृंखला. शब्द आणि अर्थ भिन्न आहेत, असे भासते | परोल |

५) भर्तृहरी आणि सोस्यूर दोघांनीही पूर्णवादी दृष्टिकोण घेतला आहे. सोस्यूरच्या भाषाव्यवस्थेचा मूळ घटक म्हणजे भाषिक चिन्ह. ही व्यवस्था तिच्या घटकांच्या एकमेकांतील संबंधांच्या गुंतागुंतीच्या रचनेने घडलेली असते. त्या चिन्हाचे अस्तित्वच या परस्परसंबंधांनी निश्चित होते. त्या व्यवस्थेच्या बाहेर या चिन्हाला अस्तित्व नसते. थोडक्यात, चिन्ह हा संदर्भनिष्ठ घटक आहे.

भर्तृहरीचा पूर्णवादी दृष्टिकोण त्याच्या 'शब्दब्रह्म' या संकल्पनेत व्यक्त झाला आहे. त्याच्या मते, भाषा ब्रह्मरूप आहे (वेदान्त दर्शनाच्या अर्थाने 'ब्रह्म'). ती सर्वव्यापी आहे, एवढेच नव्हे, तर केवळ तिलाच अस्तित्व आहे. ती निरवयवी पूर्णतत्त्व आहे (वाक्य. १.१-२). अशी भाषा म्हणजे अर्थातच, परा वाणी. आणि या पातळीवर असणारा स्फोटसुद्धा निरवयवी असतो. म्हणजेच त्यातील शब्द आणि अर्थ एकात्मच असतात.

भर्तृहरी असे मानतो की, एखादा पूर्ण घटक म्हणजे त्या घटकांच्या अवयवांची बेरीज नव्हे, तर तो घटक त्या बेरजेपेक्षा स्वतंत्रपणे काहीतरी अधिक असतो. त्या अवयवांचे ज्ञान करून घेत, क्रमाक्रमाने पूर्ण घटकाचे ज्ञान प्राप्त करता येते, हे खरे असले, तरी प्रत्यक्षात अवयवांना त्या घटकाच्या संदर्भातच अस्तित्व प्राप्त होत असते. त्या अर्थाने, हे अवयवही संदर्भनिष्ठच आहेत. वास्तविक निरवयवी असणाऱ्या पूर्ण घटकाचे हे 'अवयव' आभासात्मक असतात.

या तुलनेच्या अंती, अशा एका मुद्याचा उल्लेख केला पाहिजे, ज्याचा विचार भर्तृहरीने केला आहे, पण सोस्यूरने स्वतः उघडपणे केलेला नाही. हा मुद्दा आहे अर्थनिर्णयनाचा (इण्टरप्रिटेशन) 'वाक्यपदीय'च्या दुसऱ्या आणि तिसऱ्या काण्डात भाषिक वास्तव मानसिक वास्तव कसे व्यक्त करते आणि भाषिक व मानसिक वास्तवे आसपासच्या भौतिक वास्तवापेक्षा कशी वेगळी असतात, याची चर्चा केलेली दिसते. तसेच, वक्त्याचा संदेश श्रोत्याला कसा समजतो, श्रोत्याच्या सांस्कृतिक इ. पार्श्वभूमीचा, पूर्वानुभवांचा संदेशाच्या अर्थनिर्णयनावर काय परिणाम होतो (वाक्य. २.१३४-१३७, २.३१४-३१५) यांचाही विचार केलेला दिसतो.

सोस्यूरने स्वतः अर्थनिर्णयनाबद्दल काही म्हटलेले नाही. तथापि, त्याच्या चिन्हमीमांसेची, चिन्ह-संकल्पनेची चर्चा व प्रत्यक्ष उपयोजनही विविध क्षेत्रांत अर्थनिर्णयनासाठी केले गेलेले आहे. उदाहरणार्थ, साहित्यशास्त्र व सौंदर्यशास्त्र, मिथकांचा अभ्यास (रोलां बार्थ), सामाजिक मानववंशशास्त्र (लेवी-स्ट्राउस) इत्यादी.

सुरुवातीला म्हटल्याप्रमाणे, भर्तृहरीचा भाषाविषयक विचार संदेशन व ज्ञानग्रहण यांच्याविषयीच्या चर्चेत महत्त्वाचा ठरू शकतो. या दृष्टीने त्याच्या व्याकरण व तत्त्वज्ञान

या दोहोंचा अभ्यास भारतातील व भारताबाहेरीलसुद्धा अभ्यासक करत आहेत. आजच्या अभ्यासाच्या दिशा व विषय लक्षात घेता, भर्तृहरीच्या सिद्धांताचे व्यापक उपयोजन या क्षेत्रांमध्ये करता येऊ शकेल. त्याचे विचार नव्या संदर्भात समजून घेण्याच्या दृष्टीने अशाप्रकारच्या साम्यस्थळांचा विचार ही केवळ सुरुवात आहे.

**'वाक्यपदीय'मधील संस्कृत श्लोक**

१. द्वावुपादानशब्देषु शब्दौ शब्दविदो विदुः ।
एको निमित्तं शब्दानामपरोऽर्थे प्रयुज्यते ॥१.४४॥

२. आत्मरूपं यथा ज्ञाने ज्ञेयरूपं च दृश्यते ।
अर्थरूपं तथा शब्दे स्वरूपं च प्रकाशते ॥१.५०॥

३. यथार्थजातयः सर्वाः शब्दाकृतिनिबन्धनाः ।
तथैव लोके विद्यानामेषा विद्या परायणम् ॥१.१५॥

४. नित्याः शब्दार्थसम्बन्धास्तत्राम्नाता महर्षिभिः।
सूत्राणां सानुतंत्राणां भाष्याणां च प्रणेतृभिः ॥१.२३॥

५. नित्यत्वे कृतकत्वे वा तेषामादिर्न विद्यते ।
प्राणिनामिव सा चैषा व्यवस्थानित्यतोच्यते ॥१.२८॥

६. अनादिनिधनं ब्रह्म शब्दतत्त्वं यदक्षरम् ।
विवर्ततेऽर्थभावेन प्रक्रिया जगतो यतः ।।१.१॥
एकमेव यदाम्नातं भिन्नशक्तिव्यपाश्रयात् ।
अपृक्त्वेऽपि शक्तिभ्यः पृथक्त्वेनेव वर्तते ॥१.२॥

७. यथेन्द्रियं संनिपतद्वैचित्र्येणोपदर्शकम् ।
तथैव शब्दादर्थस्य प्रतिपत्तिरनेकधा ॥ २.१३४
वक्त्रान्यथैव प्रक्रान्तो भिन्नेषु प्रतिपत्तृषु।
स्वप्रत्ययानुकारेण शब्दार्थः प्रविभज्यते ॥ २.१३५ ॥
एकास्मिन्नपि दृश्येऽर्थे दर्शनं भिद्यते पृथक् ।
कालान्तरेण चैकोऽपि पश्यन्त्यन्यथा पुनः ॥ २.१३६ ॥
एकस्यापि च शब्दस्य निमितैरव्यवस्थितैः ।
एकेन बुद्धिभिश्चार्थो बहुधा परिकल्प्यते ॥ २.१३७ ॥

८. वाक्यात्प्रकरणादर्थादौचित्याद् देशकालतः ।
शब्दार्थाः प्रविभज्यन्ते न रूपादेव केवलात् ॥ २.३१४ ॥
संसर्गो विप्रयोगश्च साहचर्यं विरोधिता ।
अर्थः प्रकरणं लिग्ङ् शब्दस्यान्यस्य संनिधिः ॥ २.३१५ ॥

**संदर्भ :**

अय्यर, सुब्रमणिय १९६९. *'भर्तृहरी – ए स्टडी ऑफ वाक्यपदीय इन द लाइट ऑफ दि एन्शण्ट कॉमेण्टरीज.'* पुणे : डेक्कन कॉलेज.

कपूर, कपिल, १९९१, *'द लिंग्विस्टिक साइन: भर्तृहरिज् स्फोटवाद'*. (संपा.) हरजितसिंग गिल, स्ट्रक्चर्स ऑफ सिग्निफिकेशन, भाग २, पृ. २९१-९८, नवी दिल्ली, विली ईस्टर्न लिमिटेड.

----------, २०००. *'रिॲलिटी ॲण्ड इट्स रिप्रेझेंटेशन: द व्हर्बल इमेज इन इंडियन थॉट ॲण्ड भर्तृहरी'*. (संपा.) हरजितसिंग गिल व जिओवानी मॅनेटी, *साइन ॲण्ड सिग्निफिकेशन*, भाग २, पृ. ९-२८, नवी दिल्ली, बहारी पब्लिकेशन.

केळकर, अशोक रा. १९९९. *'वॉट हॅज भर्तृहरी गॉट टु से ऑन लँग्विज ?'* *'यिअरबुक ऑफ साऊथएशियन लँग्वेजिज् ॲण्ड लिंग्विस्टिक्स'* (संपा.) राजेंद्र सिंग, दिल्ली, सेज पब्लिकेशन.

भागवत वा.बा. १९६५. *'वाक्यपदीयम् (ब्रह्मकाण्डम्) मूळ ग्रंथ मराठी भाषांतरासह'* पुणे, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ.

सोस्यूर, फर्डिनांड द १९१६. *'अ कोर्स इन जनरल लिंग्विस्टिक्स.'* (अनु.) रॉय हॅरीस. १९८३. इलिनॉय, ओपन कोर्ट.

■

७०१, डी-३, ब्रह्मांड डी-ब्लॉक्स, सॅण्डोज बाग पोस्ट ऑफिस, ठाणे 400607.

## लेखनासाठी विषय

पुढील विषयांसंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे आहे :

मराठी, अन्य देशीविदेशी भाषा, भाषांची तुलना (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये, इ० भाषाविज्ञान, भाषांतर, शैली (व्यवहारातील व साहित्यातील), भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन, परिभाषा, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय धोरणे, पुस्तक-परीक्षणे, पानपूरके, पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया, आपली भाषिक प्रचीती, मराठीच्या प्रादेशिक, व्यवसायविशिष्ट, वयोगटविशिष्ट, लिंगविशिष्ट बोलींची वैशिष्ट्ये, मराठी भाषेवरील इतर भाषांचा परिणाम, कवितांचे शैलीवैज्ञानिक विश्लेषण, कवितेची भाषा, साहित्याची भाषा, परिभाषाकोशांचा परिचय/परीक्षणे.

# विंदा करंदीकरांची मुक्तछंदातील कविता

शुभांगी पातुरकर

नवकवींत विंदा करंदीकर यांना मानाचे स्थान आहे. १९४० ते १९६० या काळातील कवितांमध्ये त्यांची कविता आशय आणि अभिव्यक्तीच्या वेगळेपणाने उठून दिसणारी, नजरेत भरणारी कविता आहे. कवितेच्या छंदात, घाटात, स्वरूपात, आकृतिबंधात वेगवेगळे प्रयोग त्यांनी केले. 'स्वेदगंगा' (१९४९) ते 'अष्टदर्शने' (२००३) असा प्रदीर्घ काव्यप्रवास त्यांनी केला. त्यांच्या कवितेचे प्रमाणही विपुल आहे. त्यांची मुक्तसुनीते, तालचित्रे, सूक्ते वेगळ्या रचनाबंधाचे प्रयोग म्हणून काव्यप्रांतात नोंदविण्यात आली आहेत.

विंदांनी आपली बरीचशी कविता जरी मुक्तछंदात लिहिलेली असली तरी मुक्तछंदविषयक लेखन मात्र केलेले दिसत नाही. अर्थात 'माझ्या कवितेची वाटचाल' ('सत्यकथा' - ऑक्टो.१९६७)सारखे लेख अपवाद आहेत. याचे कारण त्यांच्या 'स्वेदगंगा' या पहिल्या काव्यसंग्रहात १९४१-४४ या काळातील कविता समाविष्ट करण्यात आलेली आहे आणि या सुमारास मुक्तछंदावरील साधकबाधक चर्चेचा जोर ओसरून तो सर्रास रुळायला सुरुवात झाली होती हे असावे. त्यांच्या या लेखात मात्र कवितेचे छंद:शास्त्रीय अंग व त्याच्या वापराची अपरिहार्य निकड यावर त्यांनी आपली मते नोंदवली आहेत.

प्रस्तुत लेखात त्यांच्या काव्यातील मुक्तछंदाचा धावता आढावा घेण्यात आला आहे.

मात्रिक मुक्तछंद : विंदा करंदीकरांची सुरवातीची म्हणजे 'स्वेदगंगा', 'मृद्गंध' यांच्या काळातील बरीच कविता मात्रावृत्तात आहे. 'पादाकुलका'सारख्या मात्रावृत्तावर त्यांचे प्रभुत्व असल्यामुळे त्यांनी या काळात मात्रिक मुक्तछंदाचे बरेच प्रयोग केले. अष्टमात्रकावर्तनी लयीची संमिश्र बांधणी असलेल्या मात्रिक मुक्तछंदातील कविता याच काळात लिहिल्या.

'स्वेदगंगा' या संग्रहातील एकूण १२ कविता मात्रिक मुक्तछंदात आहेत. 'होळी'

(पृ. ११) या कवितेच्या निमित्ताने त्यांनी पहिल्यांदा मात्रिक मुक्तछंदात रचना केलेली आहे. इथे लवंगलता (प/प/प/- +), वंशमणि (प/प- +), शुद्धसती (प - +), पादाकुलक (प/प), व एक सुटे पद्मावर्तन अशा अनुक्रमे २८,२०,१२, १६, ८ मात्रांच्या आवर्तनांचे आशयानुसारी चरण योजून हा मात्रिक मुक्तछंद तयार झाला आहे. या संग्रहातील 'संशय' (पृ. ७६) 'विजय' (पृ. ७७), 'नाच' (पृ. १६३), 'जीवितकोडे' (पृ. १६०) या कविता याच 'होळी' मात्रिक मुक्तछंदात आहेत.

या 'होळी' मात्रिक मुक्तछंदाचे अनेक उपप्रकार त्यांनी या संग्रहातील वेगवेगळ्या कवितांसाठी योजिले आहेत. उदा० 'प्रार्थना'मध्ये लवंगलता, वंशमणि, शुद्धसती एवढेच घेतले. त्यांची गाजलेली 'रक्तसमाधी' (पृ. ८२) व 'साक्षात्कार' (पृ. ५१) याच प्रकारच्या आहेत. त्यांच्या 'मजूर' कवितेत लवंगलता, वंशमणि, शुद्धसती व एक पद्मावर्तन अशी रचना आहे.

याचा आणखी एक उपप्रकार म्हणजे 'कपिवीर' हा ३६ मात्रांचा गट योजून केलेली रचना त्यांच्या 'कीर्तन' या गाजलेल्या कवितेत हा उपप्रकार आलेला आहे.

त्यांच्या 'सरोज नवानगरवाली' (पृ. ५८)मध्ये भूपति (-/प/प/- +) सह वरील मात्रिक आवर्तने आलेली आहेत, तर 'पहाटे'त (पृ. १६२) लवंगलता, वंशमणि, शुद्धसती, पादाकुलक अशी संमिश्र चरणयोजना आलेली आहे.

'होळी' या मात्रिक मुक्तछंदाच्या निर्मितीविषयी आपले म्हणणे त्यांनी 'माझ्या कवितेची वाटचाल' या लेखात नोंदविले आहे. त्यानुसार यथार्थ अभिव्यक्तीसाठी त्यांना एखाद्या लवचीक व आशयघन मुक्तछंदाची निकड भासली. वृत्तबद्धता व मुक्तछंद यांमधील पर्याय त्यांना हवा होता. आणि तो त्यांना 'होळी' कविता लिहिताना आपोआप सापडला. भाषेची लयबद्धता कायम ठेवून ओळींची लांबी परिवर्तनशील राहू शकणारा हा छंद असून आवर्तनसंख्या यदृच्छया येऊ शकत असल्यामुळे चरणांची लांबी आशयानुसारी राहू शकते व कवितेलाही त्यामुळे प्रवाहीपण मिळते.

त्यांच्या 'मृद्गंध' संग्रहातील तीन कवितांत मात्रिक मुक्तछंद आलेला आहे. 'हे माडांनो' (पृ. ३)मध्ये शुभगंगा अधिकची आहे. 'धोंड्या न्हावी' (पृ. १७)मध्ये 'होळी' हाच मात्रिक मुक्तछंद आलेला आहे तर 'यंत्र' (पृ. २४)मध्ये 'जीवनलहरी' ही भृंगावर्तनी रचनाही जोडीला घेतलेली आहे.

'धृपद'च्या काळात मात्रिक मुक्तछंदाचे प्रमाण दोनवर आलेले आहे. 'क्षणात् अद्‌भुत होते' (पृ. १) 'होळी' या मात्रिक मुक्तछंदातच आहे. तर 'खडक फोडतो अपुले डोळे' (पृ. ४०)मध्ये भृंग, पद्म संमिश्र आवर्तने आलेली आहेत.

**गद्योच्चारी छंद :** गद्यातले साधात उच्चारण पद्यातही कायम ठेवून आवर्तनमयता










साधलेला गद्योच्चारी छंद विंदांनी 'मृद्गंध'मधील 'सावल्या' (पृ. २८)मध्ये प्रथमतः वापरलेला दिसतो. प्रतिचरणी दोन आघातांचे एक आंदोलन वापरून इथे लय तयार झालेली आहे. (संदर्भ - 'माझ्या कवितेची वाटचाल'). त्यांच्या –

(१) 'हे आईन्स्टीन' (पृ. ३२), (२) 'पश्चिम समुद्रात' (पृ. ३४),
(३) 'माझ्या परसांत एकच झाड' (पृ. ३७),
(४) 'नाही रे झेपत' (पृ. ३९) (५) गर्भाधान (पृ. ४१),
(६) 'सुखाच्या शोधात' (पृ. ५३), (७) 'गोंधळ' (पृ. ५५),
(८) 'बंडखोर आत्मे' (पृ. ५९), (९) 'पांथस्थ पक्षी' (पृ. ६१),
(१०) 'कावेरी डोंगरे' (पृ. ६५) याच 'सावली' गद्योच्चारी छंदात आहेत.

याच आवर्तनाची दुप्पट म्हणजे प्रतिचरणी दोन आघातांची दोन आवर्तने असलेला 'जनता' हा गद्योच्चारी छंद त्यांनी 'ती जनता अमर आहे.' (पृ. ७३)मध्ये पहिल्यांदा वापरला.

याच संग्रहात समाविष्ट करण्यात आलेल्या √-१ या वैशिष्ट्यपूर्ण कवितेत मुक्तशैली + अष्टाक्षरी अक्षरछंद + देवद्वार अभंग + सावली गद्योच्चारी छंद यांचा संमिश्र वापर करण्यात आला आहे.

**गद्योच्चारी मुक्तछंद :** 'जातक' संग्रहातील 'तमसा' (पृ. १९)मध्ये विंदांनी हा गद्योच्चारी मुक्तछंद पहिल्यांदा वापरला. प्रतिचरणी इथे आघातस्थाने एक-दोन अथवा तीन अशी अनिश्चित आहेत व गद्योच्चारणातून येणाऱ्या लयीमुळे हा गद्योच्चारी छंद परंतु - मुक्त - म्हणविला जातो. त्यांच्या 'सोबत' (पृ. ३६), 'मासा : एक स्वरचित्र' (पृ. ३९)मध्ये हाच गद्योच्चारी मुक्तछंद आलेला आहे.

**मुक्तशैली :** 'धृपद'च्या काळात (१९५९) त्यांच्या मात्रिक मुक्तछंदाचे प्रमाण अधिकच कमी झालेले दिसून येते. गद्योच्चारी छंद, गद्योच्चारी मुक्तछंद यांच्या जोडीला मुक्तशैलीचा वापर इथे वाढलेला दिसतो. याचे कारण भावनेपेक्षा वैचारिकतेला त्यांच्या कवितेत असणारा वाव हे आहे. वैचारिकतेला वाव मिळताच कविता गद्यप्राय होऊ लागलेली आहे, हे त्यांच्या 'गोंधळ'सारख्या कवितांवरून सिद्ध होते. इथे हिटलर, गांधी, बुद्ध, महंमद, रुसो, फ्राईड, ॲडलर, मार्क्स, मनू, आईन्स्टीन सगळेच गोंधळ घालीत आहेत. 'हे आईन्स्टीन'मध्ये वैचारिकता अधिकच वाढलेली दिसून येते. 'ती जनता अमर आहे'सारख्या सामाजिक व 'त्रिवेणी'सारख्या लैंगिक जाणिवेवरील कवितेत भावनेपेक्षा वैचारिकतेला अधिक महत्त्व आलेले आहे. परिणामी त्यांचा आविष्कार गद्योच्चारी आघात असलेल्या आकृतिबंधात झालेला आहे.

याच वैचारिकतेच्या प्रभावाचा पुढचा टप्पा म्हणजे मुक्तशैली. 'धृपद'

(१९५९)च्या काळात 'संहिता'सारख्या मुक्तसुनीतात ही चिंतनशील वक्तृत्त्वप्रधान, गद्यप्राय मुक्तशैलीची रचना आधिक्याने दिसते.

'धृपद'मधील सर्व मुक्तसुनीतांमध्ये तसेच 'तालचित्रां'तही हीच मुक्तशैली आलेली आहे. 'तालचित्रे'मध्ये निरनिराळ्या तालांमुळे निर्माण होणारी कवीची भाववृत्ती विभिन्न असली तरी तिचा काव्यमय आविष्कार मात्र ठरावीक वळणाच्या लयीतूनच प्रकटला आहे. 'सूक्तां'बाबतही तेच म्हणता येईल. मात्र 'स्तन्यसूक्त'मध्ये प्रतिचरणी एक-दोन आघातांची योजना असलेली लय आहे. तेवढा अपवाद वगळता अन्य सर्व सूक्तांसाठी 'संहिता' ही मुक्तशैलीच योजिलेली आहे.

'जातक'मधील कवितांमध्ये मुक्तशैलीचा विशेष वापर असण्याचे कारण असे संभवते की इथला आशयच इतका संपन्न आहे की केवळ वैकल्पिक लयीच्या, खऱ्या अर्थी 'मुक्त' शैलीच्या अंगानेच तो प्रकटू शकतो. इथे मात्रिक मुक्तछंद वा गद्योचारी मुक्तछंद देखिल बंधनकारी ठरू शकतो.

**मुक्तछंदाच्या संदर्भात योगदान :** विंदांनी मात्रिक मुक्तछंद, गद्योच्चारी छंद, गद्योचारी मुक्तछंद व मुक्तशैली या मुक्तछंदाच्या प्रकारांचा समर्थपणे उपयोग केला.

मार्क्सवाद, अस्तित्ववाद, फ्राईड, आईन्स्टीन, भारतीय दर्शने अशा परस्परविरोधी बहुतत्त्ववादाची (प्लुरॅलिझम) जाणीव त्यांच्यासारख्या मराठी कवीला आहे. या सर्व जाणिवा त्यांच्या काव्यात अपरिहार्यपणे प्रकटल्या आहेत. त्यांच्यातील या वैचारिकतेला वक्तृत्वप्रधानता पोषक असल्यामुळे त्यांची अशा प्रकारची कविता मुक्तशैलीतून, प्रकटली आहे. त्यांच्या या प्रकारच्या मुक्तशैलीतील मुक्तसुनीते, तालचित्रे, सूक्ते वेगळ्या रचनाबंधाचे प्रयोग म्हणून मराठी काव्यप्रांतात नावाजले गेले आहेत. त्यांनी 'सुनीत' या रचनाप्रकाराला मुक्तछंदात आणले. 'तालचित्रे' हा नवा भावसंकर आणला. वैदिक सूक्तांचे मराठी मुक्तछंदात धडाक्यात पदार्पण करविले. त्यामुळे हा प्राचीन वैदिक रचनाप्रकार मराठी काव्यप्रांतात आणण्याचे श्रेय त्यांनाच आहे. त्यांची 'अष्टदर्शने' मात्र अभंगात्मक आहेत.

थोडक्यात विचारानुभवाचे एक प्रगल्भ व प्रातिभ, समृद्ध व सहज माध्यम आधुनिक मराठी कवितेला उपलब्ध करून देण्याचे श्रेय त्यांच्या मुक्तछंदातील कवितेला आहे.

**टिपा :**

(१) प्रस्तुत लेख 'मराठी मुक्तछंद' या माझ्या प्रबंधावर आधारित आहे.

(२) 'लवंगलता' इ. छंद डॉ. माधवराव पटवर्धन यांच्या 'छंदोरचना' (कर्नाटक पब्लिशिंग हाउस, मुंबई २, द्वितीय आवृत्ती, १९३७) या ग्रंथात आढळतील.

(३) लेखात ज्या कवितासंग्रहांचा उल्लेख आहे त्यांच्या आवृत्त्या याप्रमाणे आहेत :

(१) 'स्वेदगंगा' - पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पुनर्मुद्रण, १९६९.

(२) 'मृद्‌गंध' - पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पुनर्मुद्रण १९७५.

(३) 'धृपद' - पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पुनर्मुद्रण १९७८.

(४) 'जातक' - पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, दुसरी आवृत्ती, १९८३.

■

११/बी-२१, सरकारी वसाहत, हाजी अली, मुंबई 400034.
दूरध्वनी : ९५२२-२४९५०४८०

---

## प्रतिसाद २

**द. वि. (अरविंद) टिकेकर**

संदर्भ : प्र. चिं. शेजवलकर यांचे पत्र, (२४:३, पावसाळा २००६ अंक) माझे गुरू व मित्र डॉ. प्र.चिं. शेजवलकर ह्यांनी 'चेअरमन' व 'प्रेसिडेंट' ह्या शब्दांसाठी 'अध्यक्ष' व 'कार्याध्यक्ष' असे प्रतिशब्द सुचवले आहेत. हे शब्द गेली १५-२० वर्षे 'कार्पोरेट' जगतात वापरले जात आहेत. 'प्रेसिडेंट'ला कार्याध्यक्ष म्हटले तर 'एक्झिक्युटिव्ह चेअरमन'ला काय म्हणायचे ? आणि 'व्हाइस प्रेसिडेंट', 'असोसिएट व्हाइस प्रेसिडेंट' ह्यांना ? 'प्रेसिडेंट' हा कंपनीचा नोकर असतो; तो बोर्ड ऑफ डायरेक्टर्स'चा सभासद नसतो. त्याचे काम 'जनरल मॅनेजर' सारखे असते आणि त्याची नेमणूक मॅनेजिंग डायरेक्टर किंवा संचालक मंडळ करते. त्याला 'कार्याध्यक्ष' म्हणणे योग्य वाटत नाही. त्याच्यावर कंपनी - कायद्याचे बंधन नसते. त्याच्यावर कायदेशीर जबाबदारी आली (मॅनेजिंग डायरेक्टरच्या तरतुदीद्वारे) तर तो निराळा अधिकारी होतो.

व्यापारी विश्वातील खूप इंग्रजी शब्दांना नीट, अचूक, अर्थपूर्ण असे मराठी पर्याय उपलब्ध नाहीत. भागीदारी धंद्याला 'फर्म' व प्रोप्रायटी धंद्याला 'कन्सर्न' असे इंगजी शब्द आहेत. त्यांना मराठी शब्द आहेत का ? 'बुक कीपिंग', 'अकौंट्स', 'कॉस्ट अकौंटिंग' 'फायनान्शियल मॅनेजमेंट', 'मॅनेजमेंट ऑडिट', 'कॉर्पोरेट फायनान्स' इ. शब्दांना नेमका अर्थ व्यक्त करणारे मराठी शब्द आहेत का ? ■

६६/७-सी, एरंडवणा, १५वी गल्ली, प्रभात रस्ता, पुणे 411004.

---





अनुक्रमणिका

परीक्षणलेख

# सदोष पण उपयुक्त परिभाषाकोश

माधवी आपटे

[परीक्षित पुस्तक : 'भाषाविज्ञान व वाङ्मयविद्या परिभाषाकोश'. भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई. संपादकीय प्रास्ताविक : डॉ. अशोक रा. केळकर, पृष्ठसंख्या ४०+२३६, किंमत रु. १२०/-. प्रकाशनवर्ष दिलेले नाही.]

आधुनिक कोशकारितेनुसार कोशातील सर्व नोंदींची अचूक व परिपूर्ण माहिती देणे, सर्व नोंदींना योग्य पर्याय देणे, नोंदलेल्या प्रस्थापित परिभाषेला सुटसुटीत, रूढ होण्यास सहज, आणि भाषिक काटकसरीचे तत्त्व लागू असणारे पर्याय देणे ही कोणत्याही कोशाची प्राथमिक जबाबदारी असते. समकालीन भाषिक परिस्थितीत असे पर्याय स्वीकृत होण्यायोग्य असावे लागतात. याशिवाय आधुनिक कोशांत अधिकाधिक व सर्वांगीण माहिती तत्संबंधी एकाच नोंदीमधे उपलब्ध व्हावी हाही उद्देश असतो. कोशाचा जास्तीत जास्त उपयोग अभ्यासकाला व्हावा, या दृष्टीने कोशाची मांडणी असावी लागते.

प्रस्तुत भाषाविज्ञान व वाङ्मयविद्याकोशाच्या निर्मितीला १९७६ ते २००१ अशी एकूण २५ वर्षे लागली. एकूण ४४ बैठका झाल्या. उपसमितीतील सदस्यांनी आपल्या कार्यकक्षेबाहेर जाऊन काही जबाबदाऱ्या पार पाडल्या. अनेकांनी बरेच परिश्रम घेतले असे श्री.प.ग. पाटील, (तत्कालीन) भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य भाषा संचालनालय यांच्या प्रस्तावनेवरून लक्षात येते. कोणतीही परिभाषा त्या विषयाच्या सविस्तर मांडणीतून, प्रासंगिक ऊहापोहातून, लिखाणातून, चर्चेतून, संशोधनात्मक प्रायोगिकतेतून निपजावी, तसेच यथावकाश रूढ व्हावी. ही स्वाभाविक प्रक्रिया जी परिभाषा प्रस्थापित करते ती सर्वांना परिचित होता होता रुळत जाते, तसेच समजायला आणि वापरायला सुलभ होते. अशा स्वाभाविक प्रक्रियेअभावी, तज्ज्ञ मंडळींनी एकत्र येऊन, पर्यायात्मक भाषांतरित प्रतिशब्द देऊन त्यांचा कोश तयार करणे हाही पर्यायी मार्ग असायला हरकत नसावी. याला संपादकीय प्रास्ताविकात (पृ. पाच) ''वेळ

वाचविण्यासाठी स्वीकारलेला आपद्धर्म'' असे म्हटलेले आहे. या संदर्भातही कोशाच्या यशापयशाचे मूल्यमापन आपोआपच होणार हे गृहीत धरावे लागेल.

भाषाविज्ञान व वाङ्मयविद्याकोशाच्या निर्मितीबद्दल संपादकीय समिती आणि महाराष्ट्र राज्य भाषा संचालनालय अभिनंदनास पात्र आहेत. अशा कोशाची आवश्यकता निर्विवाद आहे. या कोशात आलेल्या बहुतांश नोंदी माहितीपूर्ण, उपयोगी तसेच विस्तृत व्याप्ती दर्शविणाऱ्या आहेत. संपादकीय प्रास्ताविकातील श्रेयनामावली दबदबा निर्माण करणारीच आहे. पान एकवर दिलेल्या उपसमिती सदस्यांच्या योगदानाबद्दल त्यांचे ऋण मानले पाहिजे. या कोशाच्या निर्मितीमध्ये उपसमितीत नसलेले परंतु संपादकांना बहुमोल साहाय्य केलेले असे तीन तज्ज्ञ या कामात गुंतलेले होते (पान तीन : तळटीप), असा ऋणनिर्देश डॉ. अशोक केळकरांनी केलेला आहे. यापैकी डॉ. प्रवाल दासगुप्ता (डेक्कन कॉलेज) व डॉ. उदय नारायण सिंह (दिल्ली विद्यापीठ, आता केंद्रीय भारतीय भाषा संस्थान, मैसूर) हे दोघे अमराठी तज्ज्ञ होते. डॉ. रमेश धोंगडे या मराठी भाषिक तज्ज्ञांनी या कामात संपादकांना विशेष साहाय्य केले असावे, असे मानायला हरकत नाही. तरीही कोशनिर्मितीमधे झालेल्या चांगल्या कामाबद्दल तसेच त्यात राहून गेलेल्या दोषांबद्दल सर्वांनाच जबाबदार धरावे लागेल. या कोशातील त्रुटींची जबाबदारी संपादकीय समिती, उपसमिती, तसेच विशेष सहायक या सर्वांनाच वाटून घ्यावी लागेल.

पान पाचवर उल्लेखिलेल्या अपेक्षेनुसार या परिभाषाकोशाचे मूल्यमापन तत्त्वाधिष्ठित होणे आवश्यक आहे. शब्दाची गरज भासली की माणूस शब्द तयार करतो हे खरे; परंतु प्रत्येक अभ्यासक जर आपापल्या मर्जीप्रमाणे परिभाषा तयार करील तर त्यात सुसूत्रता वा समानता राहणार नाही. परिभाषा ओळखणे आणि तिच्या वापरासाठी सर्वपरिचित एकच सामान्य पर्याय उपलब्ध असणे, विषयाच्या शिस्तीच्या व विकासाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. त्यामुळे परिभाषाकोशाच्या निर्मितीचे काम करणाऱ्यांचे परिश्रम मोलाचे आहेत. या कोशाची निर्मिती-संकल्पना, संपादकीय प्रस्तावनेत आलेली कोशनिर्मितीची अंतर्निहीत तत्त्वे (पान सहा ते पंधरा), पर्याय-निवडीमध्ये घेतलेली काळजी व परिश्रम, कोशाचा उपयोग करणाऱ्या अभ्यासकांसाठी लिहिलेली मार्गदर्शिका (पान पंधरा ते एकोणीस) हे सर्व या परिभाषा कोशाचे सबळ स्तंभ आहेत. त्याचे बहुतांश श्रेय डॉ. अशोक केळकर यांचेच असावे.

हे सर्व लक्षात घेऊनही या परिभाषाकोशाचे, संपादकांनाही अपेक्षित असलेले, मूल्यमापन अपरिहार्य आहे. या परीक्षणात हे मूल्यमापन करताना परिभाषा-निर्मितीची अंतर्निहीत तत्त्वे (पान सहा ते पंधरा) तसेच अभ्यासकांसाठी दिलेली मार्गदर्शिका

(पान पंधरा ते एकोणीस) यांच्याच आधाराने कोशातल्या प्रत्यक्ष नोंदींचे विश्लेषण व चर्चा केलेली आहे. त्याशिवाय भाषाविज्ञानातील काही मूलभूत तत्त्वांचाही आधार या मूल्यमापनात घेतलेला आहे. या संदर्भात स्वतः संपादकांनीच (पान सहा) केलेले विधान लक्षात घेण्यासारखे आहे : ''या तत्त्वांना धरून परिभाषानिर्मिती करण्याचा कसोशीने प्रयत्न केला आहे. तो पूर्णतः सफल झालेला नाही हा भाग निराळा.''

अभ्यासकांच्या सोयीसाठी हा प्रयत्न कोणत्या भागांमधे/नोंदींमधे सफल झालेला आढळत नाही याची चर्चा या परीक्षणात सोदाहरण, नोंदींचा योग्य तो उल्लेख करून तात्त्विक आधारावर केलेली आढळेल. काही अपरिहार्य सामाजिक-शैक्षणिक संदर्भही विचारात घेतलेले आहेत.

**(१) परिभाषा कोश आणि भाषाशिक्षणासाठी सद्यःस्थिती :**

(अ) प्रथमतः प्रकर्षाने जाणवलेली बाब म्हणजे या कोशातील पर्यायांवर असलेला संस्कृत भाषेचा प्रभाव. बहुतांश पर्याय हे संस्कृतप्रचुर आहेत. काही ठिकाणी सोपे, सुटसुटीत पर्याय देणे शक्य असूनही संस्कृतचे वर्चस्व जाणवेल असे पर्याय दिलेले आढळतात. या संदर्भात समाजातील एकूण शैक्षणिक परिस्थितीकडे उघड्या डोळ्यांनी पाहण्याची गरज आहे. दिवसेंदिवस भाषा-शिक्षणाचा दर्जा खालावतो आहे. भाषांच्या बाबतचे सरकारी धोरण, उच्च माध्यमिक शिक्षण महामंडळाचे तद्नुसार अभ्यासक्रम, शिक्षकांची स्वतःची प्रत्यक्ष पात्रता, त्यांतून भाषाभ्यासाला आलेले गौणत्व अशी अनेक कारणे त्यामागे आहेत. त्याहीपुढे जाऊन संस्कृत भाषेच्या संदर्भातील राजकीय, सांस्कृतिक व शैक्षणिक वातावरण ज्या प्रकारचे आहे त्यातून ती भाषा शिकणाऱ्यांचे, ती भाषा येणाऱ्यांचे प्रमाण नगण्य होत चालले आहे. अशा स्थितीत त्या भाषेचे जबरदस्त वर्चस्व असलेला परिभाषाकोश म्हणजे तांत्रिक संज्ञा-संकल्पनांना एका अनोळखी भाषेत दिलेले पर्याय होत. खेड्यापाड्यांतून, वन्य जमातींतून येणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रमाण मराठीसुद्धा परकीय भाषेसारखी शिकावी लागते तिथे संस्कृतप्रचुर परिभाषेचा काय टिकाव लागणार ? ज्या पिढीच्या लोकांनी हा कोश तयार केला त्या पिढीच्या शालेय जीवनात संस्कृत अनिवार्य विषय होता. तरी शहरांमधूनच ती भाषा अधिक प्रमाणात शिकविली - शिकली जात असावी. पण ज्या पिढीच्या अभ्यासकांसाठी हा कोश बनवला आहे त्यांना संस्कृतचे ज्ञान तर सोडाच पण ओळखही नाही; अशा स्थितीत या परिभाषाकोशाचा वापर करणे त्यांना कितपत जमेल ? त्यापोटी निराशा किंवा निरुत्साह येणे आणि परिभाषाकोशापासून ते दूर राहणे याची शक्यता अधिक आहे. तेव्हा पहिलाच आक्षेप असा की हा परिभाषाकोश काही अभ्यासकानुकूल (यूजर फ्रेन्डली), किंवा अभ्यासकानुवर्ती, किंवा विद्यार्थीकेंद्री

(लर्नर सेंटर्ड) नसून, कोश तयार करणाऱ्या मंडळींच्या मर्यादित अनुभवाधिष्ठित, आणि शहरी, विशिष्ट वर्गातील मंडळींना मानवणारा आहे. हा कोश बनवायलाच जर २५ वर्षे लागली तर कोशकारांनी निदान आणखी पुढच्या २५ वर्षांतील शैक्षणिक स्थितीचा आढावा घेऊन तो सर्वतोपरी वास्तववादी करायला हवा होता. आजच्या परिस्थितीत आढळणारी भाषाभ्यासाबद्दलची अनास्था, गुणवत्तेकडे डोळेझाक करून कागदोपत्रीच पदवी आणि गुणांची खैरात करण्याची प्रवृत्ती, त्यातून येणारा भाषेबाबतचा निष्काळजीपणा इ. बाबींचा कोशकार समितीने विचार केलेला नाही. सद्य:स्थिती आणि भविष्यातील स्थिती, भविष्यात येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या पिढ्या, या सर्वांचे भान व त्यांच्या शैक्षणिक पात्रतेचा विचार या कोशातील पर्यायांमधे आढळत नाही.

या संदर्भात कोशातील काही पर्यायांची चर्चा होणे गरजेचे आहे.

- झिअरो अनाफरा = सर्वलोपादेशी अनुवर्ती प्रतिनिधान (पृ. १३)
- बाऊण्ड अनाफरा = अनिवार्य अनुवर्ती प्रतिनिधान (पृ. १३)
- जिबरिश अफेजिया = वाक्प्रस्तुतिशक्तिघात (पृ. १४)
- बॅकफॉर्मेटिव ॲनलॉजिकल चेंज = व्युत्क्रमी उपमितिजन्य परिवर्तन (पृ. २१)

या सर्व पर्यायांपैकी जर मूळ इंग्रजी संज्ञा सुटसुटीत व सोपी वाटत असेल किंवा सुलभ अर्थवाही असेल तर तीच लोकांच्या तोंडी रुळणार, आणि रूढ होणार. वर दिलेले सर्व पर्याय संस्कृतप्रचुर तर आहेतच; परंतु सुलभ अर्थवाही नसून, कोशातील इतर ठिकाणी त्याच अर्थाने दिलेल्या संज्ञांच्या संदर्भात सुसंगत वा काटेकोर नाहीत. भाषिक काटकसरीच्या तत्त्वातही ते बसत नाहीत. वर दिलेल्या एकेका संज्ञेच्या नोंदीची चर्चा इथे योग्य ठरावी. प्रथम 'जिबरिश अफेजिया' (वाक्प्रस्तुती शक्तिघात) या नोंदीचा विचार करू.

पुढे दिलेले पर्यायही याच कोशातील आहेत :

जिबरीश = अस्फुटद्रुत भाषित हेंगाडा भाषाविभेद (पृ. ८०)

हेगांडी शब्दकळा (पृ. ८१)

अफेजिया = वाचाघात (पृ. १४)

'ग्लोबल अफेजिया'चा पर्याय 'सर्वांगीण वाचाघात' असा दिलेला आहे. 'अफेजिया'ला समर्पक पर्याय 'वाचाघात'च आहे. मग 'वाक्प्रस्तुती शक्तिघात' हा त्याहून अवघड व संस्कृतप्रचुर पर्याय कशासाठी ? त्याच ठिकाणी 'जार्गन अफेजिया'ला पर्याय 'जिबरिश अफेजिया' दिलेला आहे. 'जार्गन' आणि 'जिबरिश' या संज्ञा समानार्थी नसून विरुद्धार्थी आहेत हे लक्षात घेता त्या पर्यायाचे आश्चर्य वाटते. वाचाघात झालेल्या माणसाला पुटपुटणे किंवा निरर्थक ध्वनी काढणे शक्य होत नाही, म्हणून

'जिबरिश अफेजिया' म्हणजे तेवढेही शक्य होत नसलेला वाचाघात. पण 'जार्गन अफेजिया' ही अतिविशिष्ट अर्थाची संज्ञा आहे. 'जार्गन' म्हणजे तांत्रिक परिभाषा. ती गमावलेला मनुष्य म्हणजे जार्गन अफेजिया झालेला मनुष्य. जिबरिश व जार्गनचा गोंधळ अनाकलनीय आहे. पुढे (पृ. ८०) तर जिबरिशाचा अर्थ 'हेंगाडा भाषाविभेद' असाही दिला आहे. निष्कर्ष हा की कोशात एकाच संज्ञेसाठी दिलेल्या पर्यायांमधे सुसंगती नाही. 'व्याख्यासुलभता' (पान सात व ३) या तत्त्वाचे पालन झालेले नाही. तसेच या संदर्भात 'एकतंत्ररक्षण' (पान सात व ४) याही तत्त्वाला छेद गेलेला आहे. म्हणजे संस्कृत-प्रभावित पर्याय क्लिष्ट व बोजड तर झालेच; पण निश्चित स्वरूपाच्या पर्यायापासून ही नोंद लांबच राहिली. (एकेरी पारिभाषिक पर्याय शक्य नसेल तेथे एखाद्या तळटिपेमार्फत अधिक खुलासेवार माहिती देणे शक्य असते.)

दुसरी नोंद 'बॅकफॉर्मेटिव ॲनलॉजिकल चेंज'. ही इंग्रजी परिभाषा आकलनाला सोपी आणि प्रक्रियादर्शक असल्याने रुळायलाही सहज आहे. 'व्युत्क्रमी उपमितिजन्य परिवर्तन' या संस्कृतप्रचुर पर्यायापेक्षा सोपा मराठी पर्याय म्हणजे 'उलट दिशेने घडणारा साम्यदर्शी बदल.' आता 'झिअरो अनाफरा' व 'बाऊण्ड अनाफरा' या पारिभाषिक नोंदींकडे पाहू. 'झिअरो' = शून्य. 'अनाफरा' म्हणजे विविध काव्यपंक्तींच्या सुरुवातीला एखाद्या शब्दाची किंवा शब्दसमूहाची जाणीवपूर्वक पुनरावृत्ती. अनाफराचा अगदी लघुत्तम अर्थ काढला तरी त्याला 'आद्यशब्द पुनरावृत्ती' असा पर्याय देता येईल. त्यामुळे 'झिअरो अनाफरा'चा सोपा पर्याय 'आद्यशब्दाची शून्य पुनरावृत्ती' असा देता येईल. या पर्यायाच्या तुलनेत 'सर्वलोपादेशी अनुवर्ती प्रतिनिधान' असा क्लिष्ट पर्याय देण्याचे प्रयोजन कळत नाही. 'बाऊण्ड अनाफराला'ही असाच सोपा पर्याय देता आला असता. 'बाऊण्ड'चा अर्थ या संदर्भात 'अवलंबून असलेले/स्वतंत्रपणे वापरता न येणारे' असा आहे. याला 'बंधित', 'परतंत्र' असा सोपा व सुटसुटीत पर्याय दिला तर 'बाऊण्ड अनाफरा'ला 'आद्यशब्दाची बंधित पुनरावृत्ती' असे म्हणता येईल.

**शब्दपूर्व आणि शब्दोत्तर प्रत्ययांचा गोंधळ :**

या परिभाषाकोशात प्रत्ययांबाबतही सुसूत्रता वा सातत्य आढळत नाही. 'पोस्ट' या शब्दपूर्व प्रत्ययाला 'उत्तर' असा पर्याय देऊनही (पृ. १४४), 'पोस्टवोकॅलिक कॅरिक्टर' या पारिभाषिक शब्दसमूहाला 'स्वरोत्तर वर्णचिन्ह' असा पर्याय न देता 'स्वरयोगी वर्णचिन्ह असा पर्याय दिलेला आहे. 'री' या शब्दपूर्व प्रत्ययाला 'पुनः' असा मराठी पर्याय रूढ आहे. पण 'रीआर्टिक्युलेशन'ला 'पुनरुच्चारण' असा पर्याय न देता 'अनु-उच्चारण' (पृ. १५२) असा पर्याय देण्याचे कारण काय ? पारिभाषिक पर्यायांना जेव्हा सर्वपरिचित पर्याय उपलब्ध असतात तेव्हा अनोळखी, अगम्य पर्याय

देण्याचे प्रयोजन काय ? यावरून अशी शंका वाटते की परिभाषा ही अपरिचित आणि अगम्य असेल तरच भारदस्त वाटेल, गांभीर्यपूर्ण राहील असा काही (अप)समज तर यामागे नसेल ? एका ठिकाणी री-चा पर्याय 'अनु'तर इतरत्र मात्र तो वेगळा. पृ. १५२ वरच 'रिबॉरोअिंग'ला 'पुनरादान', 'परावर्ती आदान' असे पर्याय आहेत. म्हणजे एकाच पानावर दोन वेगवेगळे पर्याय ! 'रीप्रॉडक्शन' म्हणजे 'पुनरुत्पादन', मग ते भाषिक का असेना ! परंतु कोशात मात्र त्याचा पर्याय 'संदेश-अनुप्रेषण' (पृ. १५७) असा आहे ! प्रेषण म्हणजे पाठविणे. यानुसार 'संदेश अनुप्रेषण' म्हणजे 'रीसेंडिंग अ मेसेज'. मग त्याचा 'मेसेज रिप्रॉडक्शन' असा अर्थ होईल का ?

या कोशात 'री' या शब्दपूर्व प्रत्ययाबाबत खासच गोंधळाची स्थिती दिसते. 'रेण्डिशन'चा पर्याय जर 'प्रस्तुति' (पृ. १५७) असेल तर 'रीरेण्डिशन'चा पर्याय 'पुनःप्रस्तुति' असायला हवा. त्याला 'अनुप्रस्तुतीकरण', 'अनुप्रस्तुति' असे म्हणण्याचे कारण काय ? (पृ. १५८).

शब्दोत्तर प्रत्ययांबाबतही अशीच गोंधळाची स्थिती आहे. – करण, – भवन, – प्रवण, – जन्य, – योगी, – वाचक, – दर्शक, – पूरक, – दायी इ. उत्तरप्रत्ययांचा अनिर्बंध वापर हा पर्यायी संज्ञांमधील धोकादायक सापळा आहे. सुनिश्चितता, सातत्यापूर्णता ही तत्त्वे महत्त्वाची आहेत. शब्दोत्तर प्रत्ययांचा उचित, सुनिश्चित, आणि सातत्यपूर्ण वापर पारिभाषिक पर्यायांच्या शिस्तीमधे बसला असता.

भाषेतील बहुतांश शब्द हे 'आर्बिट्ररी' किंवा यादृच्छिक असतात. वस्तू व तिचा वाचक शब्द यांमध्ये काही सकारण संबंध असतोच असे नाही. अशा स्थितीत पर्यायी संज्ञेतील सर्व घटकांचा अर्थबोध व्हावाच, अथवा सर्व लक्षणांनी परिपूर्ण असाच पर्याय असावा असा दुराग्रह नसावा. सोपा, सुटसुटीत, अगदी नवा पर्यायही रूढ करता येतो. मूळ वस्तू/पदार्थ आणि त्यासाठी असलेले भाषिक चिन्ह यांच्या सतत सहयोगानेच अर्थबोध होतो किंवा रुळतो. त्यामुळे नव्याने तयार केलेले सोपे, सुटसुटीत, सुपरिचित अथवा ओळखायला सहज असे पर्याय देऊन रूढ करणे ही भाषा-वैज्ञानिकांची जबाबदारी आहे. तसे करण्यावर परिभाषाकोशाचा भर असणे आवश्यक आहे.

**(३) पारिभाषिक पर्यायच उपलब्ध नसणे :**

प्रस्तुत परिभाषाकोशात अनेक पारिभाषिक संज्ञांच्या नोंदी कोणताही पर्याय न देता सोडून दिलेल्या आहेत. उदा० 'वरायटी' हा मूळ शब्द व त्याचा पर्याय कोशात उपलब्धच नाहीत. 'वेरियन्ट', 'वेरिएशन' अशा संबंधित, विस्तारित शब्दांचे पर्याय सापडतात. शिवाय 'विभेद' हा पर्याय इतर नोंदींमधे आढळतो तर मग तो 'वरायटी'

या नोंदीसमवेत कुठेच का आढळत नाही हे एक गूढ आहे. या संदर्भात विखुरलेल्या विविध नोंदींमधून वरायटी = विभेद असा निष्कर्ष काढता येईल का ? पर्याय नसलेल्या इतर काही नोंदी अशा :

- लँग्विज् युनिवर्सल = ?? (पृ. १०५) याला 'भाषेतील वैश्विक घटक' असा पर्याय देता येईल. [कोशातील (पृ. ११०) पर्याय. 'भाषेचे सार्वत्रिक अभिलक्षण' व 'भाषेचा सार्वत्रिक नियम']
- लंगाज् = ? ? (पृ. १०१) ही संज्ञा सोस्यूरने अत्यंत तांत्रिक अर्थानेच वापरली. 'बेटर : लँग्विज्' म्हणून लंगाज = लँग्विज् अशी बोळवण करून कसे चालेल ? याला पर्याय म्हणून लंगाज् = सामूहिक भाषाक्षमता /भाषाधारणा असा पर्याय देता येईल. [कोशातील पर्याय (पृ. १०२) 'भाषासंस्था']
- जार्गन = ?? (पृ. ९८) पर्याय : विषयनिष्ठ तांत्रिक शब्दभांडार. [कोशात (पृ. ९८) परिभाषानिष्ठ भाषाविभेद]
- वोकल = ?? (पृ. १९९) घोष, घोषीय ? (इतर पर्यायांवरून) 'वॉईस्ट' या संज्ञेला 'घोषित' असा पर्याय दिलेला असला तरी 'वोकल कॉर्ड/फोल्ड'ला मराठीत 'स्वरयंत्र' असा रूढ पर्याय सुपरिचित आहे. मग 'घोषकारकवलि(का)', 'घोषवलिका' असे पर्याय कशासाठी ? पृ. १९९ वरचे या संदर्भातले पर्याय 'घोष', 'स्वर', 'वाचा' या विविध पर्यायी रूपांचा मुक्त वापर करताना दिसतात. याच संज्ञेच्या संदर्भात मात्र मूळ इंग्रजी संज्ञा किती सदोष आहेत हे दाखवून पारिभाषिक भाषांतरासाठीचे पर्याय (पान बारा-तेरा : परिच्छेद तिसरा) अशी चर्चा केलेली आहे. 'वोकल' या संज्ञेला सुपरिचित 'कंठजन्य' असाही पर्याय देता येईल.
- कोहिअरन्स = ? ? (पृ. ३५) पर्याय : 'तार्किक सुसूत्रता', किंवा 'वैचारिक सुसंबद्धता'. [कोशातील पर्याय (पृ.१९५) 'योग्यता', 'योयता-समार्थ्य', 'एकार्थि भाव']

### (४) इंग्रजी-मराठी-संस्कृत खिचडी

प्रस्तुत परिभाषाकोशातील अनेक पर्यायांमधे मूळ इंग्रजी अंश जशाच्या तसा मराठी/संस्कृत शब्दांना जोडून विनाकारणच चमत्कारिक, क्लिष्ट पर्याय निर्माण केलेले दिसतात. या प्रकारच्या पर्यायांमधून काय साधते समजत नाही. जर मूळ इंग्रजी संज्ञाच त्यात वापरली तर मराठी-संस्कृत शेपट्या/ठिगळे लावण्यात काय अर्थ ? त्यामुळे हे पर्याय अकारण लांबतात आणि घोटाळ्यात टाकतात. याची काही उदाहरणे पाहू:

• पिजिन = पिजिनीभूत भाषाविभेद, पिजिन भाषा
• क्रियोल = क्रियोलीभूत भाषाविभेद, क्रियोल भाषा
• स्पूनरिजम = स्पूनरभाषित (पृ. ६०वर 'व्यवहित वर्णव्यत्यास')

आश्चर्य म्हणजे या संज्ञांचा खुलासा फक्त इंग्रजीतच करण्यात आलेला आहे. मूळ 'पिजिन', 'क्रियोल' किंवा 'स्पूनरिजम' म्हणजे काय याचा उलगडाच या कोशाच्या पर्यायांमधून होत नाही. या संज्ञांना निश्चितपणे यापेक्षा चांगले, सोपे, आणि संज्ञेचा अर्थबोध देणारे पर्याय देता येतात - तेही सहज आकलन होण्यासारख्या सुपरिचित मराठीतून !

• पिजिन = मिश्र आकुंचित भाषा (याला संपर्कजन्य किंवा व्यापारजन्य अशी विशेषणे लावल्यास संज्ञेचा प्रक्रियात्मक उलगडाही होतो.)
• क्रियोल = मिश्र विस्तारित भाषा (यालाही संपर्क-वारसाजन्य असे विशेषण लावल्यास त्या संज्ञेचा अर्थ अधिक स्पष्टपणे हाती लागतो.)
• स्पूनरिजम = प्रथमाक्षर गोंधळ. बरेचदा बोलताना शब्दांच्या प्रथमाक्षरांची / आद्याक्षरांची गडबड होऊन अदलाबदल होते. उदा० काचेची काटली × बाचेची बाटली; गार वारा × वार गारा; गोड बाळ × बोड गाळ इ.)

संज्ञांचे योग्य पर्याय देण्यासाठी मुळातच सामाजिक भाषावैज्ञानिक ज्ञान, संकल्पनांची स्पष्टता, आणि संदर्भ समजून काम करण्याची शिस्त असावी लागते. या गोष्टी या कोशाच्या रचनेत कमी पडल्याचे जाणवते.

**(५) चुकीचे पर्याय :**

या कोशात काही संज्ञांना चुकीचे पर्यायही दिलेले दिसतात. काही ठिकाणी मूळ संज्ञेचा एक अर्थ देऊनही इतरत्र त्याच संज्ञेसाठी निरनिराळे पर्यायही वापरलेले आढळतात. किंवा कधी कधी विविध संकल्पनात्मक पारिभाषिक संज्ञांसाठी एकच एक पर्याय वापरल्याने संकल्पनात्मक गोंधळाची परिस्थिती निर्माण होते. कदाचित कोशाला अंतिम स्वरूप देताना त्या टप्प्यावर जे एकहाती संपादकीय संस्करण व्हायला हवे होते ते झालेले नसावे. किंवा संपादनाच्या विविध जबाबदाऱ्या संभाळणाऱ्यांची अंतिम बैठक होऊन, कोशाच्या नोंदींवरून शेवटचा हात फिरलेला नसावा. या परिभाषाकोशातील चुकीचे वा घोटाळलेले पर्याय असे :

• बाऊण्ड अनाफरा = अनिवार्य अनुवर्ती प्रतिनिधान (पृ. १३)
• ऑटोमॅटिक = अनिवार्य (पृ. २०)
• ऑब्लिगेटरी = अनिवार्य, आवश्यक, नित्य (पृ. १३०)

'अनिवार्य' हा पर्याय केवळ तिसऱ्या नोंदीतच योग्य आहे. बाऊण्डला परतंत्र किंवा बंधित हा पर्याय बरा.

ऑटोमॅटिक = स्वयंप्रवृत्त (स्वयंप्रेरित) किंवा स्वयंचलित, हे पर्याय सर्वश्रुत आहेत.

- यूजेबिलिटी = सामर्थ्य (पृ. ४१, १९५)
- यूजेबिलिटी थ्रू कोहिअरन्स = योग्यता सामर्थ्य (पृ. ४१, १९५)

या नोंदींमध्ये चुकीचे पर्याय आहेत असे वाटल्यावर प्रथम कोहिअरन्स ही संज्ञा शोधायला गेले तर तिचा पर्यायच दिलेला नाही ! उलट 'यूजेबिलिटी कोहिअरन्स'कडे निर्देश केलेला आहे. खरे तर कोहिअरन्स म्हणजे भाषण, संभाषण किंवा दीर्घ लेखनातील तार्किक सुसूत्रता किंवा वैचारिक सुसंबद्धता. यूजेबिलिटी म्हणजे वापर–योग्यता किंवा उपयोजनयुक्तता. 'यूजेबिलिटी थ्रू कोहिअरन्स' म्हणजे तार्किक सुसूत्रतेतून उद्‌भवणारी (सुसूत्रोद्‌भव) वापरयोग्यता.

(१) • कण्डिशन = संकेत, अट (पृ. ४१)
(२) • मनिप्युलेटिव कॉम्पिटन्स = भाषाव्यवस्था सामर्थ्य / भाषा व्यवस्था प्रभुत्व (पृ. ३८)
(३) • मॅलॅप्रॉपिजम = वक्रतुंडी भाषित (पृ. ११४)
(४) • पेडॅगॉजिकल ग्रॅमर = शालेय व्याकरण (पृ. १३७)
(५) • कॉम्पोझिट बेस = समस्त साधनांग (पृ. ३८) [असा पर्याय देऊनही कंसात व्यामिश्र/सामासिक साधनांग असे पर्याय दिले आहेत.]
(६) • कॉम्प्लेक्स = संश्लिष्ट, व्यामिश्र (पृ. ३८)

हे सर्व पर्याय चुकीचे किंवा घोटाळलेले आहेत.

(१) 'कंडिशन'ला स्थितीलक्षी/स्थितीजन्य अट असे म्हणता येईल.

(२) 'मनिप्युलेटिव' या शब्दाचा अर्थ काय ? 'कॉम्पिटन्स' या शब्दाचा अर्थ 'सामर्थ्य'ही नाही आणि 'भाषाव्यवस्था'ही नाही ! सामान्यपणे 'कॉम्पिटन्स' म्हणजे 'क्षमता'. सामर्थ्य हा 'अबिलिटी'चा पर्याय होऊ शकेल. इतर अनेक शब्दांप्रमाणे 'सामर्थ्य' हा शब्दही ढिलेपणाने वापरलेला आढळतो. मनिप्युलेटिव हे सहेतुक जोडतोड किंवा सहेतुक घडामोड यांच्याशी संबंधित विशेषण. हे सर्व पाहता 'मॅनिप्युलेटिव कॉम्पिटन्स' या संज्ञेचा पर्याय 'सहेतुक/हेतुपुरस्सर भाषाचालन क्षमता' असा हवा होता.

(३) मॅलप्रॉपिजम हा शब्दप्रयोग उद्‌भवला तो शेरिडन या ब्रिटिश नाटककाराच्या 'द रायवल्ज्' या नाटकातील एका विनोदी पात्रावरून. श्रीमती मॅलप्रॉप हे विनोदी पात्र भारदस्त शब्द वापरण्याच्या हौशीपोटी/हव्यासापोटी उच्चारसाधर्म्य असलेले भलतेच

शब्द वापरून हास्यास्पद चुका करते. या तिच्या सवयीला तिच्या नावावरून 'मॅलप्रॉपिजम' हा शब्द रूढ झाला व तेव्हापासून तो तत्सम चुका करणाऱ्या व्यक्तींच्या संदर्भात वापरला जातो. याचा पर्याय 'वक्रतुंडी भाषित' कसा काय होतो ? अगदी सहज सोपा पर्याय सुचवायचा तर 'उच्चारसाधर्म्यी शब्दांचा प्रामादिक वापर' असा किंवा 'उच्चारसाधर्म्यी प्रमाद' असा सुचविता येईल.

(४) 'पेडॅगॉजिकल ग्रॅमर' या संज्ञेचा तांत्रिकदृष्ट्या योग्य पर्याय देणे शक्य तसेच आवश्यकही होते. 'शालेय व्याकरण' हा अंदाजी टोला (या प्रकारच्या व्याकरणाबद्दल तुच्छता दाखवणारा ?) वाटतो. पेडॅगॉजी म्हणजे अध्यापन-रीती किंवा पद्धती, अथवा अध्यापनशास्त्र. हे केवळ शालेय पातळीसाठी असा अर्थ नाही. तेव्हा पेडॅगॉजिकल ग्रॅमर म्हणजे अध्यापनार्थ/अध्यापनयोग्य/अध्यापन पद्धतीचे व्याकरण किंवा अध्यापनशास्त्रीय व्याकरण.

क्र. ५ व ६ पर्यायांत 'समस्त', 'संक्रमण', 'व्यामिश्र', व 'सामर्थ्य' हे शब्द निव्वळ सोयीनुसार ताबडवून घेतल्याचे दिसते.

(५) ● कॉम्पोझिट = व्यामिश्र, समस्त (पृ. ३८) योग्य पर्याय : संयुक्त, एकत्रित.

(६) ● कॉम्प्लेक्स = व्यामिश्र, संश्लिष्ट (पृ. ३८) योग्य पर्याय : बहुपेडी, बहुपदरी, बहुपदी.

● ओव्हरलॅप = संक्रमण, ओव्हरलॅपिंग = परस्परसंक्रमी (पृ. १३४) योग्य पर्याय = परस्परातिक्रमण, अतिव्याप्ती.

जेवढे तपशिलात जाऊ तेवढी त्रुटींची जंत्री वाढतच जाण्याची भीती आहे. अशा प्रकारचे विद्वत्तापूर्ण काम सद्य:स्थितीतील शिक्षण, समाज, मानसिकता इत्यादींचे भान ठेवून, यापेक्षा अधिक गांभीर्याने, चिकित्सक दृष्टीने आणि जबाबदारीने, पूर्वग्रहविरहित द्रष्टेपणाने व्हायला हवे होते.

भाषाविज्ञान कोशाच्या तुलनेत वाङ्मयविद्या कोशात सर्वश्रुत, परिचित पारिभाषिक पर्याय दिलेले आहेत असे दिसते. तरीही पृ. २०७ या पहिल्याच पानावर 'ॲक्सेप्टेड : बेटर रिसीव्हड', असा निर्देश करून 'रिसीव्हड'ला पृ. २२६वर 'परंपरागत' असा पर्याय दिलेला आहे. त्याचप्रमाणे 'ॲक्सेप्टेड रीडिंग', 'ॲक्सेप्टेड व्हर्शन' यांच्यासाठी 'रिसीव्हड व्हर्शन', 'रिसीव्हड रीडिंग' असे निर्देश देऊन पुढे पृ. २२६वर अनुक्रमे 'परंपरागत पाठ' 'परंपरागत ग्रंथरूप' असे पर्याय दिले आहेत. त्याचप्रमाणे 'ॲडिशन : बेटर इंटरपोलेशन', 'ॲडस्क्रिप्ट' = बेटर मॉर्जिनॅलिझम,', 'ॲडव्हर्सेरियम' इ. संज्ञांचेही मराठी पर्याय तेथेच न देता इंग्रजीमध्ये याला त्यापेक्षा बरा शब्द काय हे

दाखवून देण्याचे या कोशाचे उद्दिष्टच नसताना तो उपद्व्याप कशासाठी ते समजत नाही. पृ. २०८वर 'अमॉर्फस' या संज्ञेचा अर्थ केवळ 'अनिश्चित' असा दिला आहे. वास्तविक त्याचा योग्य पर्याय असा : 'निश्चित रूपाकार विरहित'. पृ. २१० वर 'कोलेशन'चा पर्याय केवळ 'तुलना' असा दिला आहे. यामध्येही 'चिकित्सक तुलना' किंवा 'व्यवस्थित जुळणी' असे पर्याय अधिक योग्य ठरले असते. 'कोलेट'चा अर्थ व्यवस्थेची शहानिशा करून घेणे असा आहे.

एकूण कोशातील नोंदींचे यशापयश किंवा कोशाचे मूल्यमापन करताना नमूद करावे लागेल की बहुतांश नोंदी विचारांना चालना देणाऱ्या आहेत. त्या दृष्टीने कोशाचे महत्त्व असाधारण आहे. त्याचबरोबर हेही नमूद करावे लागेल की कोशाची यानंतरची आवृत्ती निघताना कोशावरून अनाग्रही, समजूतदार संपादकीय हात फिरण्याची नितांत गरज आहे.

या कोशातून संपादकांची विद्वत्ता दिसते त्याऐवजी त्यातून कोश वापरणाऱ्यांची आकलनक्षमता लक्षात घेतली गेल्याचा प्रत्यय यायला हवा होता. भाषावैज्ञानिक, तसेच कोशकारितासंबंधित तत्त्वांशी निष्ठा अपेक्षित होती. रूढ आणि सामान्यत: परिचित पर्याय देण्याऐवजी इंग्रजी संज्ञांना त्यापेक्षा बरे इंग्रजी पर्याय देण्याची पद्धत थोर आहे !

या कोशाच्या पुढच्या आवृत्तीमधे संस्कृतप्रचुरता, क्लिष्टता, चुकीचे पर्याय देणे किंवा पर्यायच नसणे, गोंधळात टाकणारे पर्याय देणे इ. त्रुटींवर मात करणे आवश्यक आहे. मराठी भाषाविज्ञानाच्या नवीन पिढीतील अभ्यासकांना या क्षेत्राबाबत उत्सुकता व रुची निर्माण होईल याची काळजी घेण्याच्या दृष्टीने भाषेसंबंधी रंजक तरी मोलाची माहिती, दोन भाषांमधील संज्ञा-वापराबद्दलच्या रंजक नोंदी इ.चा समावेश होणे गरजेचे आहे.

महाराष्ट्रात बहुतांश नवे अभ्यासक साहित्याकडेच वळतात. भाषाविज्ञानाबाबत गोडी निर्माण होणे, मराठी भाषेचा अधिकाधिक शास्त्रीय अभ्यास होणे यासाठी वातावरण अनुकूल होण्याची गरज आहे. उत्कृष्ट कोशनिर्मितीतून नवे अभ्यासक आकर्षित करता येतील. आधीच मराठीचे विद्यार्थी भाषाविज्ञानाकडे रुक्ष व क्लिष्ट विषय म्हणून पाहतात. हा दृष्टिकोण बदलायला मदत करण्याची एक मूल्यवान संधी या कोशाने गमावली आहे याचा खेदपूर्ण उल्लेख करावा लागेल. ■

१४-ब, मित्रमंडळ कॉलनी, नवा उस्मानपुरा, औरंगाबाद 431005.

# न्यायालयीन मराठी : आव्हाने व उपाय*

प्रभाकर ज. जोशी

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर प्रजासत्ताक लोकशाहीप्रधान शासन प्रणाली स्वीकारण्यात आली. लोकप्रतिनिधींद्वारा 'लोकसभा' आकाराला आली. 'स्वातंत्र्य, समता, बंधुता' या त्रिसूत्रीचा स्वीकार करून 'नव्या भारताची' उभारणी होऊ लागली. 'भारतीय राज्य घटना' तयार करून शासन संस्थेला कायद्याच्या चौकटीत बंदिस्त करून वाटचाल सुरू झाली. 'लोककल्याणार्थ' संसदेने कायदे तयार करावयाचे. त्यांची अंमलबजावणी 'प्रशासना'ने करावयाची आणि या वाटचालीत 'कायदेशीर' तडजोड 'न्यायसंस्थेने' घडवून आणावयाची, यासाठी 'शासन - प्रशासन आणि न्यायसंस्था' यांची निर्मिती झाली. शासन, समाज, सहकारक्षेत्र इत्यादींवर अंकुश ठेवण्याचे कार्य न्यायसंस्था करते. भारतीय दंड संहितेच्या अधीन राहून शासन, प्रशासन, समाज, सहकार इत्यादी क्षेत्रांतील चांगल्या-वाईट घटनांविषयी कायद्यांची अंमलबजावणी करण्याच्या संदर्भात न्यायनिवाडा करणारे क्षेत्र म्हणजे 'न्यायसंस्था' होय. 'दिवाणी - जिल्हा - प्रादेशिक - उच्च - सर्वोच्च' अशा चढत्या क्रमाने न्यायालयांचे कार्य सुरू असते. भारतीय घटना आणि कायद्यांविषयी माहिती देणारे सर्वच ग्रंथ इंग्रजीतून आहेत. स्वातंत्र्यपूर्व काळात व नंतरही न्यायालयांचे कामकाज इंग्रजीतूनच चालते आहे. मराठी राजभाषा झाल्यावर न्यायालयांचे कामकाज मराठीतून व्हावे यासाठी प्रयत्न झाले.

शासनाने तसे दि. २१/७/१९९८ ला परिपत्रक काढून 'न्यायालयीन कामकाज मराठीतून व्हावे', असा आदेश दिला. त्यामुळे न्यायालयीन क्षेत्रात काही प्रमाणात मराठीचा वापर वाढला. इंग्रजी शब्दांना पारिभाषिक शब्द तयार झाले. त्यांचा वापर होऊ लागला आणि त्यातूनच 'न्यायालयीन मराठी' हे एक नवे अभ्यासक्षेत्र निर्माण झाले.

---

*(शारदाबाई पवार महिला महाविद्यालय, शारदानगर, बारामती, जि. पुणे येथे दि. १० व ११ जाने. २००६ रोजी चर्चासत्रात सादर केलेला निबंध)

---



अनुक्रमणिका

## न्यायालय-क्षेत्रातील पारिभाषिक संज्ञा :

समाजजीवनातील विविध घटनांच्या संदर्भात कायदेशीर मार्गदर्शन मिळण्याची अपेक्षा न्यायसंस्थेकडून असते. वैयक्तिक स्तरावर किंवा पोलीस खात्यांमार्फत विविध गुन्हे, घटना यांची नोंद न्यायालयात होत असते. या गुन्ह्यांचे स्वरूप दखलपात्र आणि अदखलपात्र अशा स्वरूपाचे असते. हक्क आणि आर्थिक देवघेव स्वरूपाचे गुन्हे 'दिवाणी' न्यायालय आणि गुन्हेगारी, चोरी, दरोडेखोरी, अत्याचार, शोषण इत्यादी स्वरूपाचे गुन्हे 'फौजदारी' न्यायालयात दाखल होतात. न्यायालयात जर आपण सहज फेरफटका मारला तर सांकेतिक भाषेतील काही शब्दप्रयोग/वाक्यरचना कानी पडतात. उदाहरणार्थ, F.I.R. भरला/P.C. मिळाली/M.C. मिळाली/In - C.P. झाले/Stay मिळाला. यातील इंग्रजी शब्द न्यायालयीन कामकाजाशी संबंधीत असतात. त्यांचे अर्थ समजून घ्यावे लागतात :

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | F.I.R | First Information Report | प्रथम माहिती अहवाल |
| (२) | P.C. | पोलीस कस्टडी | पोलीस कोठडी |
| (३) | M.C. | मॅजेस्ट्रेट कस्टडी | न्यायालयीन कोठडी |
| (४) | In C.P. | In Camera Proceeding | (न्यायाधीश, साक्षीदार व दोन्ही पक्षांचे वकील यांचे) बंद खोलीतील कामकाज. |
| (५) | Stay | स्टे मिळाला | स्थगिती मिळाली. |

मराठी प्रतिशब्द वापरण्यापेक्षा संक्षिप्त इंग्रजी शब्दांचा वापर करणेच त्या क्षेत्रात अधिक सोयीचे असल्याचे सांगितले जाते. कारण त्यांचा कायदेशीर अर्थ मराठीतून परिणामकारक पद्धतीने व्यक्त करणे शक्य होत नाही, असे जाणकारांचे मत आहे. असे असले तरी न्यायालयीन क्षेत्रातील नित्य वापरल्या जाणाऱ्या काही इंग्रजी संज्ञांना मराठीतील पारिभाषिक संज्ञा तयार करवून घेऊन त्या वापरल्या जात आहेत. न्यायालयात वापरल्या जाणाऱ्या काही मराठी **पारिभाषिक संज्ञा** पुढीलप्रमाणे :

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| जज् | न्यायाधीश | ॲक्युज्ड | आरोपी | इन्जक्शन | मनाई हुकूम |
| मॅजिस्ट्रेट | न्यायदंडाधिकारी | सर्च | झडती | ऑर्डर | आदेश |
| कोर्ट | न्यायालय | सूट | दावा | कम्प्लेनंट | फिर्यादी |
| जजमेंट | न्यायपत्र | शुअर्टीज् | जामीन | डिफेण्डण्ट | प्रतिवादी |
| सेन्टेन्स | शिक्षा | ॲडव्होकेट | वकील | डिफेन्स | बचाव |
| ॲवॉर्ड | निवाडा | ॲरेस्ट | अटक | अटॅचमेंट | जप्ती |
| एविडन्स | पुरावा | रिस्ट्रेन | अटकाव/प्रतिबंध | बॉण्ड | बंधपत्र |
| | | | | हिअरिंग | सुनावणी |



अनुक्रमणिका

यासारख्या पारिभाषिक संज्ञांचा वापर करून न्यायालयीन कामकाजात मराठी भाषेचा वापर होताना दिसतो. आधुनिक मुद्रण साहित्याच्या शोधामुळे आरोपपत्र मराठीतून दाखल केले जात असल्याचेही निदर्शनास येते.

न्यायाधीशांनी काही प्रमाणात 'निकालपत्र' मराठीतून देण्याचे प्रयत्न केलेले आहेत. संबंधित दाव्यासंदर्भातील कायदेशीर चौकशी पूर्ण झाल्यावर न्यायाधीश आपल्या निकालपत्रात शेवटी निर्णय देत असतात. ते निर्णय इंग्रजीमध्ये विशिष्ट शब्दरचनेत लिहिले जातात. तिचेच मराठीकरण करून वापरण्यात आलेली भाषा पुढीप्रमाणे :

| | |
|---|---|
| (१) सूट इज पार्टली डिक्रीड | = दावा अंशतः मंजूर करण्यात येत आहे. |
| (२) ॲप्लिकेशन इज हियरबाय रिजेक्टेड | = अर्ज नामंजूर करण्यात येत आहे. |
| (३) ॲप्लिकेशन इज ग्राटेड ॲण्ड ऑपो- नण्ट इज् हियरबाय डायरेक्टेड टु... | =अर्ज मंजूर करण्यात येत असून विरोधी बाजूला आदेश देण्यात येतो की,... |

या विवेचनातून न्यायालयीन मराठीचे स्वरूप कशा प्रकारचे असते याची कल्पना येईल. न्यायालयाचे कामकाज कायद्याच्या विशिष्ट तंत्रात अडकलेले असते. ते तंत्र सांभाळूनच न्यायालयीन क्षेत्रात मराठीचा वापर करण्यात येत असल्याचे लक्षात येते. ते-ते संदर्भ स्वीकारूनच काही पारिभाषिक संज्ञांचा अर्थ समजून घ्यावा लागतो. उदा० सेन्टेन्स्, नोटिस, ऑर्डर, ॲवॉर्ड, सर्च, अटॅचमेंट इत्यादी शब्दांचे अर्थ व्यवहारात आणि न्यायालयीन परिभाषेत वेगवेगळे होतात. न्यायालयीन क्षेत्रातील काही शब्दांना मराठी प्रतिशब्द देणे कठीण असते. त्यांचा वापर तसाच करावा लागतो. उदा० बेलीफ, मॅक्झिम, इन कॅमेरा प्रोसिडिंग इत्यादी. लॅटीन भाषेतील 'मॅक्झिम' म्हणजे म्हणी जशा आहेत तशाच आजही वापरल्या जातात. त्यांना इंग्रजीतही प्रतिशब्द देता येत नाहीत. मराठीत तर नाहीच नाही.

उदा० Damnum sine Injuria
Injuria sine Damnum

**आव्हाने व उपाय :**

'न्यायक्षेत्र' हे भारतीय दंडसंहितेनुरूप कार्य करीत असते. त्यातील टेक्स्ट् म्हणून वापरले जाणारे सर्वच साहित्य इंग्रजीत आहे. बऱ्याच कायद्यांची निर्मिती राष्ट्रीय स्तरावर होते. भारतासारख्या बहुभाषिक देशात एकाच प्रादेशिक भाषेत कायदे असणे व्यवहार्य ठरणार नाही. इंग्रजी किंवा हिंदी भाषेतील मूळ कायद्यांचे प्रादेशिक भाषेत भाषांतर करताना मुख्य आशय बाधित होणार नाही याची काळजी घेणे आवश्यक असते. म्हणूनच न्यायालयाच्या सर्व स्तरांवर मराठीचा वापर करणे हे 'आव्हान' ठरते.

मराठीतून न्यायालयीन कामकाज व्हावे असे वाटत असेल तर त्या क्षेत्रातील पारिभाषिक संज्ञा व विशिष्ट प्रकारची कायद्याची भाषा सर्वांना परिचित करून देणे गरजेचे ठरेल. या क्षेत्रातील मराठीचा वापर वाढवायचा तर प्रथम भावनिक भाबडेपणाचा मार्ग सोडून कृतिलक्ष्यी विचार करण्याची गरज आहे. भाषेचा विकास हा भाषेच्या वापरातूनच होत असतो. न्यायालयीन क्षेत्रातील 'सहज व सुलभ' अशा मराठी शब्दांचा सातत्याने वापर करण्यात आला तर ते शब्द समाजमन आपोआप स्वीकारेल. या क्षेत्रातील वकिलांनी, न्यायाधीशांनी जाणीवपूर्वक 'जेथे शक्य आहे तेथे' मराठी पारिभाषिक शब्दांचा वापर करून मराठीतून निकालपत्र देण्याचा प्रयत्न केला तर 'न्यायालयीन मराठी भाषा' सर्वांना परिचित होईल. भाषा-विकासात 'भाषिक नियोजन व वापर' याला अधिक महत्त्व आहे. स्वभाषेवरील उत्कट प्रेम हे भाषेचे अस्तित्व व संवर्धन यासाठी आवश्यक असते. त्याचा आधार घेऊन न्यायालयीन मराठी भाषेची जोपासना करण्यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न होणे गरजेचे आहे.

संदर्भ ग्रंथ :

जोशी, प्रभाकर व चारुता गोखले (संपा.)१९९३ 'सामाजिक भाषा विज्ञान', निराली प्रकाशन, पुणे.

तावरे, स्नेहल, (संपा.) १९९४. 'व्यावहारिक मराठी', स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे.

नसिराबादकर, डॉ. ल.रा. २००२. 'व्यावहारिक मराठी', फडके प्रकाशन, कोल्हापूर.

■

मराठी पदव्युत्तर विभाग, प्रताप कॉलेज, अमळनेर.

---

निवेदन

## ग्रंथ पुरस्कार

'लोकवाङ्मय गृहा'ने प्रकाशित केलेल्या उत्तम कांबळे यांच्या 'आई समजून घेताना' या पुस्तकाच्या साहित्यिक, समाज-मानववंशशास्त्रीय अशा विविध दृष्टिकोणांतून केलेल्या समग्रलक्षी सर्वोत्कृष्ट समीक्षेला प्रख्यात विचारवंत डॉ. रावसाहेब कसबे यांनी रु. १०,०००/- एवढ्या रकमेचा पुरस्कार जाहीर केला आहे.

समीक्षा 'लोकवाङ्मय गृह', भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई - ४०००२५ (दूरध्वनी : २४३६२४७४) या पत्त्यावर ३१ ऑक्टोबर २००६पर्यंत पाठवावी.

# शब्दांचे बदलते अर्थ

अ.द. मराठे

(१) मराठी भाषेत तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातील आत्मा ह शब्द प्रचारात आहे. खरं तर आत्मन् या संस्कृत शब्दाचा अर्थ 'आपण, स्वत:' असा आहे. 'आत्मनो मुखदोषेण बध्यन्ते शुकसारिका:।' (=स्वत:च्याच तोंडाच्या दोषाने पोपट आणि मैना बंधनात पडतात.) 'आत्मैव ह्यात्मनो बंधुह्यात्मैव रिपुरात्मन: ।' (=आपणच आपले मित्र असतो आणि आपणच आपले शत्रू असतो.) मात्र तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात 'आत्मा' या शब्दाला वेगळाच अर्थ प्राप्त झाला आणि व्यवहारात तो दोन्ही अर्थांचे मिश्रण करून रूढ झाला. 'तुझ्या या वर्तनामुळे माझ्या आत्म्याला (मला/माझ्या मनाला) किती वेदना होतात म्हणून सांगू !' एक पिता आपल्या पुत्राला म्हणाला. माझ्यासारखा पुत्र म्हणाला असता, ''तात, आत्मा हा सुखदु:खादी विकारांचा विषय नाही. आत्म्याला असे विकार होणे शक्य नाही !'' पण सामान्य माणसांच्या मनावर कीर्तनप्रवचन ऐकून आत्मा हा शब्द ठसतो; त्याचे तात्त्विक स्वरूप ठसत नाही. मग सुखदु:खाच्या भ्रामक जाणिवेत स्वस्वरूप विसरणारा आणि दु:खात पडणारा आत्मा, दु:ख होणारे आपले मन, दु:खी होणारा मी अशा अनेक अर्थांचे मिश्रण व्यावहारिक अर्थात होते.

(२) वृत्तपत्रे, नियतकालिके यांच्या क्षेत्रातून आलेला शब्द : 'अंक.' 'टाइम्सचा परवाचा अंक वाचला का ?' 'मनोहरचा सप्टेंबरचा अंक मिळाला नाही.' या वाक्यातील अंक या शब्दाचा अर्थ काय ? अंक या शब्दाच्या प्रचलित अर्थांपैकी कोणता अर्थ येथे अभिप्रेत आहे ? याचे उत्तर आहे 'आकडा' आणि तो इंग्रजी 'नंबर' या शब्दाचे भाषांतर आहे. महाराष्ट्राच्या प्रबोधनकाळात नियतकालिके सुरू झाली. त्यांच्यावर उल्लेख असे : विविध ज्ञानविस्तार – मासिक पुस्तक, अंक ४ इ. इंग्रजी नियतकालिकांवर उल्लेख असतो 'व्हॉल्युम वन' (हा रोमन आकडा असतो.) 'नंबर फोर' (हा आकडा इंग्रजी असतो.) यातील 'व्हॉल्युम'चा अर्थ मोठ्या ग्रंथाचा एक खंड आणि 'नंबर'चा अर्थ असतो त्या खंडाचा क्रमांक चार. ही इंग्रजी पद्धत मराठी नियतकालिकांनी स्वीकारली. मात्र त्यातील नंबरचे भाषांतर अंक असे केले. खरे तर

ते भाषांतर क्रमांक असे हवे होते. कित्येक नियतकालिकांवर उल्लेख असतो वर्ष ६वे अंक दुसरा. त्या नियतकालिकाची सुरुवात जून महिन्यात झाली तर त्याचे वर्ष दुसऱ्या .पुढील वर्षाच्या मे महिन्यात संपेल. त्यामुळे त्या नियतकालिकाचा वार्षिक क्रमांक दोन हा जुलै महिन्यात असेल. म्हणजेच एखाद्या नियतकालिकाचा अंक (क्रमांक) आणि महिना इ.चा क्रमांक एक असेलच असे नाही. मराठीत नियतकालिके सुरू झाली, पण अमुक नियतकालिकाची अमुक महिन्याची प्रत असा शब्द रूढ झाला नाही/ केला गेला नाही. प्रत या शब्दाऐवजी अंक शब्द रूढ झाला आणि त्यालाच 'प्रत' हा अर्थ मिळाला.

(३) 'जाणिवेच्या रुंदावणाऱ्या कक्षा', 'ज्ञानाच्या वाढत्या कक्षा' अशी वाक्ये आपण वाचतो. त्यातील 'कक्षा' या शब्दाचा अर्थ 'आवाका' 'विस्तार' होतो. मात्र कक्षा या शब्दाचा खरा अर्थ आहे काख : दंड आणि खांदा यांच्या सांध्याखालील भाग. हाताची हालचाल १८० अंशांत होत असल्याने काखेचाही तेवढाच विस्तार होतो आणि लांबीरुंदीच्या मापाने हाताच्या लांबीएवढी जागा व्यापली जाते. हा विस्तार शरीराबाहेर होतो. त्यामुळे ज्ञान, जाणीव इ. गोष्टींची व्याप्ती पूर्वप्रचलित व्याप्तीहून वाढणे, या अर्थी कक्षा रुंदावणे/वाढणे/विस्तारणे हे वाक्प्रचार रूढ झाले.

(४) विस्तार पावत जाणे या अर्थाचा आणखी एक शब्द बदल न होता प्रचारात आहे. तो म्हणजे संतती/संतान. प्रत्येक माणसाचे कुटुंब मुलगा, नातू, पणतू, खापरपणतू, निपणतू असे पुढे पुढे वाढत असते. त्यालाच सख्खे, चुलत, मामे अशा अनेक शाखा फुटत जातात. या सगळ्या प्रसाराचा 'वंश' बनतो. वंश याचा एक अर्थ आहे वेळूचे बन/बेट. एका वेळूला अनेक 'पोरं' फुटत त्याचे 'वंशवन' होते. सं+तन् (८ उ.प.) या धातूचा अर्थ आहे पसरणे, विस्तारणे, निर्माण होणे. कुटुंबाचा वंशात विस्तार करणाऱ्या प्रत्येक घटकाला या धातूवरून नाव दिले आहे 'संतती', 'संतान'. या दोन्ही शब्दांचा व्युत्पत्त्यर्थ आहे वाढ, प्रसार.

(५) सही करणे या अर्थी आज आपण 'स्वाक्षरी' हा शब्द वापरतो. तो इंग्रजीतील 'सिग्नेचर' या शब्दाच्या अर्थाचा द्योतक आहे. त्याचा अर्थ आहे, एखादे करारपत्र, मृत्युपत्र, खरेदी-विक्रीसारख्या व्यवहाराचे कागद इत्यादींवर 'स्वीकारले आहे' या अर्थाने आपले नाव लिहिणे. पण अशा प्रकारे आपल्या हाताने आपले नाव लिहिणे याला हजार वर्षांपूर्वी स्वाक्षरी म्हणत नसत तर 'स्वहस्त' म्हणत. 'स्वहस्तो मम महाराजाधिराजश्रीहर्षस्य' ही सम्राट हर्षवर्धनाची 'सही' प्रसिद्ध आहे. सही ह्या विषयात अमरकोशातील एक चरण उद्धृत करतो :

'क्लीबे सत्यापनं सत्यंकारः सत्याकृतिः स्त्रियाम् ॥' २.८२

अमरकोशावर माहेश्वरी टीका या नावाने एक टीका प्रसिद्ध आहे. तिचे खरे नाव 'अमरविवेक' आहे. टीकाकाराचे नाव महेश्वरभट्ट रामचंद्रभट्ट सुखटणकर. (स.स. १७१८ ते १८१६). वर उद्धृत केलेल्या चरणावर टीका देताना ते म्हणतात, 'सत्यापनं, सत्यंकारः, सत्याकृतिः त्रयं अवश्यं मया एतत् क्रेतव्यं इत्यादिरूपस्य सत्यस्य करणे 'सई करणे' इति ख्याते । (सत्यंकारः तु लोके सच्कार, विसार इत्यादि प्रसिद्धः ।' यावरून स्पष्ट होते कीं 'सही' म्हणजे खरे, सत्य. याच अर्थाने हा शब्द हिंदीत वापरला जातो. 'अमुक व्यवहार मला मान्य आहे,' असे पंचांच्या उपस्थितीत मान्य करावे लागे. या क्रियेला, मान्यतेला सत्यापन, सत्यकार, सत्याकृति अशी अनुक्रमे नपुं. पुं. स्त्री. अशा लिंगांत नावे होती. या सत्यंकारात बाधा निर्माण झाल्यास पंचाच्या उपस्थितीत आरोपीला दिव्य करावे लागे. या दिव्याच्या क्रियेला सत्यक्रिया म्हणत. व्यवहार सत्य असणे महत्त्वाचे होते आणि त्यात असत्य आले तर दैवी अवकृपा होईल अशी सर्वांची धारण होती. शपथ घेऊन, देवावरील फूल उचलून, पिंडीवरील बेल उचलून वचन देणे म्हणजे 'सही करणे' (सत्यंकार) होते. व्यवहाराचा स्वीकार सिग्नेचरने करण्याची पद्धत नवी न्यायव्यवस्था देणाऱ्या इंग्रजांनी येथे रुजवली. मात्र या व्यवहाराचे नामकरण पूर्वीचेच 'सही' असे राहिले. आणि त्याला 'सिग्नेचर' हा नवा अर्थ प्राप्त झाला किंवा चिकटला.

■

१६८/१०, शांतिनाथ अपार्टमेंट, यशवंतनगर, तळेगांव दाभाडे, जि. पुणे 410507.

## संदर्भ कसे द्यावेत ?

संदर्भ देण्याची नवी, सोयीस्कर व जागेचा अपव्यय टाळणारी पद्धत पुढे दिली आहे. या पद्धतीचाच लेखकांनी आपल्या लेखात उपयोग करावा : लेखात ज्या ठिकाणी संदर्भ द्यावयाचा असेल तेथे कंसामध्ये संबंधित पुस्तक-लेखकाचे नाव द्यावे आणि त्यापुढे संदर्भित पुस्तक/लेखाचे प्रकाशनवर्ष द्यावे. त्यानंतर, आवश्यक असल्यास, स्वल्पविराम देऊन पृष्ठक्रमांक लिहावा व कंस पुरा करावा. लिखाणाच्या अखेरीस 'संदर्भसूची'मध्ये संदर्भातील सर्व तपशील द्यावेत.सूचीतील प्रत्येक नोंदीतील तपशिलांचा क्रम साधारणपणे असा ठेवावा : लेखकाचे आडनाव, स्वल्पविराम, नावांची आद्याक्षरे, प्रकाशनवर्ष, ग्रंथाचे शीर्षक, पूर्णविराम, प्रकाशनसंस्था, स्वल्पविराम, प्रकाशनस्थळ, पूर्णविराम. संदर्भसूची मराठीच्या वर्णक्रमानुसार असावी.

# पुरुषांची भाषा

केशव सखाराम देशमुख

'पुरुषांची भाषा' स्वतंत्रपणे विचारात घेता येते. तिची उच्चारपद्धती, तिची शैली, तिचे नाना संदर्भ या गोष्टी वैशिष्ट्यपूर्ण असतात. नवे, निराळे व्याकरण मांडता येण्याइतपत पुरुषांच्या भाषेची प्रकृती, तिचे स्वरूप लक्षवेधी, वैशिष्ट्यपूर्ण असल्याचे दिसून येईल.

'अधिकार' गाजविण्याचा एक 'तोरा' पुरुषी भाषेतून अधिक जाणवतो. याउलट, 'स्त्रियांची भाषा' ही सुसंस्कृततेच्या वा शिष्टाचाराच्या निकट जाणारी भाषा आहे. 'अबे', 'अरे', 'कर', 'ठेव', 'धर', 'उचल', 'चल जा', 'नीघ इथून', 'चालता हो, 'पुन; इथे पाय ठेवू नकोस'– अशी नाना रूपे पुरुषी भाषेत अधिक आढळतात. अधिकारशाहीला जवळची असणारी पुरुषी बोलण्यातील उपरोक्त शब्दरूपे जेव्हा स्त्रियाही अशा पद्धतीने वापरतात, तेव्हा तिच्यात अभिप्रेत तो उर्मटभाव किंवा 'स्व'-प्रतिष्ठा प्रदर्शित करणारा सुप्त हेतू नसतो. 'पुरुषांच्या भाषे'त मात्र मूलतः, निसर्गतः तो जाणवतो. तात्पर्य, विकार, विचारधर्माचे एक प्राकृतिक 'पौरुष' पुरुषी भाषेतून प्रकट हात असते.

प्राचीन काव्यविमर्षक मम्मट (चवथे शतक) याने 'कांतासम्मित उपदेश' असे एक काव्यप्रयोजन लिहून ठेवलेले आहे. त्यातून, स्त्रियांच्या भाषेतील माधुर्य, श्रोत्याला न दुखवणे, आल्हाद आदि गुणविशेष सूचित केले गेले आहेत. पुरुषांच्या भाषेत हे गुणविशेष विरळा आढळतात. कारण स्त्रियांना 'गळा' आहे; आणि पुरुषांना 'नरडे' ! त्यामुळे, परिणामांची तीव्रता प्रकट करणारी आणि समोरच्यास वठणीवर आणणारी परिणामदर्शी भाषा पुरुष वापरतात. 'शिव्या' असे त्या एका भाषा-गटास शीर्षक देता येईल.

समोरच्या माणसाला 'सरळ' करायचे अथवा त्याला 'नीट्ट' करावयाचे; म्हणजे एखादी शिवी 'हासडायची', म्हणजे मग तो 'वळणा'वर आणि 'वठणीवर' येतो. पुरुषांच्या भाषेतून आधिक्याने आढळणारा हा 'भाषिक खाक्या' स्त्रियांच्या भाषेत एवढा भडक, जहाल प्रकृतीत नसतो. सारांश, स्त्रियांची भाषा प्रभावजन्य परंतु मऊ

आहे. पुरुषांची भाषा परिणामकारक पण कडक भाषा आहे.

पुरुषांच्या भाषेचे संक्रमित होणार आणखी वैशिष्ट्ये असे की शिवी ही मार किंवा हल्ला करण्याआधीची पहिली पायरी आहे. आधी शिव्यांची लाखोली, त्यानंतर मार, स्वार वा हमला ! (पोलिसांच्या शिव्या या वर्गात मोडतात.)

पुरुषांमध्ये – शाळकरी 'मुले' कोटिप्रधान, श्लेष घडविणारी भाषा वापरतात. भाषेसमवेत ही मुले खेळतात. जसे – दाढीवाला (बोकड), डोक्यावर केस नसणे (टकल्या), नाक नसणे (नकट्या), उंच (उंट), मोठ्या मिशा (पंधाड्या) किंवा ठेंगणे (बुटक्या) असे कंसात दर्शविलेले शब्द (रूप व शारीरनिष्ठ वर्णन करणारी भाषा) मुले वापरतात.

ग्रामीण भागात वयोवृद्ध पुरुषमंडळी नवे नवे शब्द योजून बोलतात. जसे : मुले (गाभरं), मुलगी (कार्टी), म्हैस (डोबाड), विचित्र (सचित), मुले (दूचितर) पुरुषलिंग (डेंगणं), शेळ्या (शेल्डं), खोडकर (औकाळी), येणे (उगवणे), मृत्यू (खपणे), अशी शब्दरूपे उपयोगात आणली जातात.

पुरुषांच्या तोंडात कायम बसलेल्या काही वैशिष्ट्यपूर्ण शिव्या आढळतात. ज्या, सर्वांसमक्ष, भेद न पाळता, उजागरपणे आणि भीडभाड न पाळता सर्रास दिल्या जातात. जसे : गवसीच्या, गधडीच्या, बटकीच्या, चोदीच्या, भोसडीच्या, कुडात, देव्हाऱ्यात, हुंगायला, चाटायला, बोंबलत, हेलपाटत. अशी शिव्यांची रूपे पुरुषांच्या अखत्यारीत शिष्टसंमत समजून खेड्यापाड्यांतून उपयोगात आणली जातात.

आई, बहीण, मुलगी यांचा लिंगसाक्षेप अथवा समागमसापेक्ष 'उद्धार' करणे ही पुरुषी भाषेतील पूर्वापार चालू असलेली 'मध्यवर्ती' प्रकृती आढळते. स्त्रियांच्या भाषेला विनयाचे अस्तर आहे. लज्जेचा शिष्टाचार आहे. पुरुषांची भाषा स्वैर, मुक्त व भीडभाड तोडणारी भाषा आहे. ''शिवी देणारा समाधानी आणि शिवी खाणारा वठणीवर'' हे पुरुषी भाषावापराचे मध्यवर्ती सूत्र होय.

पुरुषी भाषेत 'अहंकार' अधिक आहे. मूलतः 'स्वामित्वा'चा अंश तिच्यात अधिकच. उर्मटपणाकडे तिचा कल जास्त. भाषिक स्वातंत्र्य ओढून घेणारी अशी पुरुषी भाषा. यामागील ठळक करणे कोणती असावीत ? तर स्त्रियांच्या तुलनेत (१) लिंगभेद, (२) स्त्रियांपेक्षा 'पुरुष' जास्त 'बाहेर' व संपर्कात (३) प्रवास, भटकंती, (४) वाईट संगतीचा प्रभाव (५) व्यसने, (६) बडबड इत्यादी.

■

मराठी विभाग, प्रमुख श्रीमती राजकुँवर महिला महाविद्यालय, जालना.
दूरध्वनी : ९४२२७२१६३१/०२४८३-२४०१८१

# काही शब्दचित्रं

शरदिनी मोहिते

पुण्यातल्या रस्त्यांवरच्या विक्रमी खड्ड्यांच्या, रस्त्यांवर ठीकठिकाणी उमटलेल्या छोट्यामोठ्या - जास्ती करून मोठ्याच - बऱ्या बेताच्या उंचीच्या, कधी अति उंचीच्या, कधी शहाण्या आकाराच्या, तर कधी 'काहीच्या' काही आकार धारण करणाऱ्या स्पीड ब्रेकर्सच्या कृपेमुळे 'ब्रेक' झालेली हाडं खिळखिळी होत चाललेली असतात, तरी हैराण होण्याखेरीज दुसरा इलाजच नसतो. लांबचं अंतर पार करण्यासाठी बस, रिक्षा, स्कूटर इत्यादींची मदत घेत, नव्यानेही निर्माण झालेले खड्डे, अखंडपणे सुरू असलेली जागोजागची खोदकामं... हे सगळं सोसत, गचकत, गचक्या खात आल्या दिवसाला शरण जात जणू नव्याच संकटांना आणि वेदनांना सामोरं जात दिवस कंठण्याची वेळ आलेली आहे...

अशाच एका 'सुदिनी' कंबर जणू विस्कटून गेली !... ते दुखणं बरंच आणि बराच काळ पुरवलं. ट्रॅक्शनचाही आसरा घ्यावा लागला... पण पूर्वी अनेकदा कानी पडलेलं, पण लावणी म्हणून ऐकून सोडून दिलेलं आणि तरीही आकर्षक ठेक्यामुळे मोहक लयीमुळे लक्षातच राहून गेलेलं गाणं – 'नाचू कशी, नाचू कशी, कंबर लचकली' - ट्रॅक्शन घेता, घेताही वरचेवर कानात घुमायला लागलं !... कंबर लचकली तरी दिनक्रम थांबवता येतो थोडाच ?... त्यामुळे, पूर्वी किंवा अजूनही या लावणीचा दृश्याविष्कार छोट्या किंवा मोठ्या पडद्यावर पाहिलेला नसूनही, लचकत्या कंबरेचं काल्पनिक हिंदकळणं मनासमोर साकारलं एवढं मात्र खरं !

त्यातल्या कंबर – कम्बर – या शब्दानंही एक वेगळीच कल्पना मनासमोर उभी केली. 'कंबर' हा शब्द लिहिताना 'क' त्याच्या रचनेमुळे, त्याच्या रूप - आकारामुळे शब्दचित्रच वाटत गेला. 'कंबर'च्या उच्चारातही 'कंबर' नजरेपुढे उभी करण्याची ताकद आहे... विंध्य सातपुड्याला हिंदमातेचा कंबरपट्टा म्हटलं गेलं, तेही कुठेतरी पटल्यासारखं झालेलं. कारण हिंदुस्थानच्या आकाराला अनुरूप चित्रित केली गेलेली हिंदमाता लहानपणी अनेकदा पाहण्यात आली होती...

आणि जेव्हा केव्हा मलिकंबरचं नाव पुढ्यात येतं, तेव्हा त्यानं कमरेला कोणत्या रंगाचा शेला बांधला असेल, असा विचार मनात आल्यावाचून राहात नाही !

गमतीचा भाग सोडला तरी 'क'प्रमाणे 'ळ'ची रचनाही नेहमी लक्षात राहण्याजोगी वाटली. 'ळ'चे दोन गोल ह्या दोन तागड्या असाव्यात ही समजूत 'तूळ'चे लेखन आणि त्याच्या सोबतीला असलेल्या तराजूच्या चित्राकडे पाहून अधिक पक्की झाली !... खुद्द 'ळ' दोलन दाखवतोसं वाटे. शिवाय तूळ - तुला या तराजूच्या तागड्यांचं दोलन चालूच असतं. न हालता, न डोलता गुपचूप राहिलेल्या तराजूची कल्पना सहसा येत नाही... वजन करण्यापूर्वी दोन्ही हातांनी थांबवल्या, तरच त्या तागड्या थांबणार !...

अक्षरांचं लेखन, त्यांचे आकार, त्यांचे उच्चार, त्यांचं चित्रित रूप या गोष्टी पाहताना गंमत वाटते. 'श्री' पाहिल्यावर आपल्या मनातली श्रीमूर्तीच भर्जरी शेला पांघरून बसल्यासारखी वाटते - ती 'श्' मुळे... तीच गोष्ट ऐश्वर्यची. 'ऐ'ची ऐटदार रचना, आकार, 'श्व'चा साजिवंत श्वास आणि रफाराचा रुबाब या सगळ्या गोष्टींचा एकत्रित परिणाम, म्हणजे साक्षात् ऐश्वर्याचंच दर्शन !

प्रत्यंचा हा शब्दच ताणलेलं धनुष्य नजरेसमोर उभं करतो, एवढंच नाही तर त्यातून सुटलेला 'सूंऽ सूंऽऽ' जाणारा बाणही डोळ्यांदेखत वेग पकडतो. हे दिसायला रामानंद सागरांच्या रामायणाची आवश्यकताच नाही.

ढ्रो किंवा धुडुम् यांचा रणधुमाळी उभी करण्यात फार मोठा भाग !

सों सों किंवा हिंदीतील साँय साँय वाऱ्याच्या प्रचंड झोतांबरोबर आपल्याला देखील कुठच्या कुठं नेऊन सोडतं...

शांत शांत वातावरणात मंद समीरणाच्या हळुवार झोक्यांबरोबर, वळणदार प्रवाहातून झुळझुळणारं पाणी मनालाही शांतवतं खचित !... पण त्याच वहात्या पाण्यावर सहस्ररश्मीचे निरनिराळ्या प्रहरी निरनिराळ्या मूडनिशी पसरणारे किरण लाटांचं दिपवणारं रूप लकाकवत राहातात, केवढं तरी अपरिमित सुंदर तेज झळकावत राहतात... लकलक लकलक... किती छान ! आणि तेच काळजाला भिडणारं लकलकणं चंद्रकिरणात मिस्किलपणे लुकलुकतं, आकाशातल्या चांदण्यांसारखं !

■

ए १/४, शरयूसरिता नगरी, फेज-२, सिंहगड रस्ता, पुणे 411030.
दूरध्वनी : २४२५१३५३



अनुक्रमणिका








[चित्रांविषयी : अक्षरांच्या निव्वळ आकारातून नि आभासातून अक्षरवेध घेत घेत अक्षरांशी खेळता खेळता केलेली अक्षररचना वा अक्षरलीळा.]

■

ए-२०२, मोहिनी दर्शन, महात्मा फुले पथ, डोंबिवली (पश्चिम),
जि. ठाणे. पिन ४२१२०२.



अनुक्रमणिका





# भाषेतील लिंगभेद, पदनामं आणि आदरार्थी बहुवचनं

कैलास सार्वेकर

'भाषा आणि जीवन' २४:२ / उन्हाळा २००६ मधील 'भाषेतील लिंगभेद' हे प्र.ना. परांजपे यांचे संपादकीय तसेच त्याच अंकातील 'प्रकाश संत यांच्या कथांची भाषा' हा विनायक गंधे यांचा लेख वाचला. त्या संदर्भात लिंगभेद, पदनामं आणि आज्ञार्थी बहुवचनं या संदर्भातील काही निरीक्षणं येथे नोंदवीत आहे. प्रथम लिंग-व्यवस्थेसंदर्भात. सीमा प्रदेशाच्या भाषेतील लिंगव्यवस्था फारच अनियमित व लवचीक असते. विनायक गंधे यांनी या बोलीत पुंलिंगी नामांचे उल्लेख नपुंसकलिंगात येतात याची अनेक उदाहरणे दिलेली आहेत. वऱ्हाडी बोलीत मात्र स्त्रीलिंगी पात्रांच्या बोलण्यात बऱ्याचवेळा पुंलिंगी क्रियापदांचा वापर दिसतो. उदा. प्रतिमा इंगोले यांच्या 'सपन' या कथेत हुंडा मागणाऱ्या नवरदेवाशी लग्न करण्यास विरोध करताना या कथेची नायिका म्हणते, ''...त्येच्यापरास मी लगनच करत नाही. दहावीची परकसा *देतो.* आन ट्रेनिंग घिवून मास्तरीन होतो.'' पुढे याच कथेत रुसलेल्या नवरदेवाला देण्यासाठी सोन्याचा गोफ घेऊन जाणाऱ्या बापाला अडवून ती म्हणते, ''बापू ! तुम्ही तो गोफ निवू नका. मी शेवटाचं *सांगतो.* नामी त मी अळात डळी *मारतो.*'' ('युवकभारती' इ. ११वी, २००३, पृ. १०१). उद्धव शेळके, सदानंद देशमुख, बाबाराव मुसळे या वऱ्हाडी बोलीत लेखन करणाऱ्या लेखकांच्या कथा-कादंबऱ्यांत अशी अनेक उदाहरणे मिळतात.

मराठीत वापरली जाणारी पेदनामं प्रामुख्याने इंग्रजीतून आलेली असली तरी इंग्रजी आणि मराठी पदनामांच्या लिंगामध्ये बरेच भेद दिसून येतात.

इंग्रजीतील बहुसंख्य पदनामं उभयलिंगी आहेत तर मराठीमध्ये पदनामांची पुंलिंगी आणि स्त्रीलिंगी रूपे भिन्न असतात. काही इंग्रजी व मराठी पदनामं आणि त्यांची पुंलिंगी व स्त्रीलिंगी रूपं एकासमोर एक लिहिली म्हणजे वस्तुस्थिती लगेच लक्षात येते :

| | इंग्रजी | | मराठी | |
|---|---|---|---|---|
| | पुंलिंग | स्त्रीलिंग | पुंलिंग | स्त्रीलिंग |
| १) | प्रेसिडेंट | – | सभापती | – |
| २) | चेअरमन | चेअरपर्सन/चेअरवुमन | अध्यक्ष | अध्यक्षा |
| ३) | प्रिन्सिपल | – | प्राचार्य | प्राचार्या |
| ४) | हेडमास्तर | हेडमिस्ट्रेस | मुख्याध्यापक | मुख्याध्यापिका |
| ५) | मॅनेजर | – | व्यवस्थापक | व्यवस्थापिका |
| ६) | डायरेक्टर | – | संचालक | संचालिका |
| ७) | सुपरवायझर | – | पर्यवेक्षक | पर्यवेक्षिका |
| ८) | टीचर | – | शिक्षक | शिक्षिका |
| ९) | लेक्चरर | – | व्याख्याता | व्याख्याती |
| १०) | प्रोफेसर | – | प्राध्यापक | प्राध्यापिका |
| ११) | प्रोड्यूसर | – | निर्माता | निर्माती |

उपरोक्त पदनामांतील इंग्रजीत केवळ 'हेडमास्तर' आणि 'चेअरमन' या दोघांचा अपवाद वगळता सर्व पदनामं उभयलिंगी आहेत. 'चेअरमन'चा 'चेअरपर्सन' हा पर्याय उभयलिंगी आहे.

पदनामच काय पण सकल चराचर सृष्टीला मराठी भाषा लिंग बहाल करते. मग ते मानवेतर पशू, पक्षी असे सजीव असोत नाहीतर निसर्गातील झाडं, फुलं किंवा दगड, माती अशा निर्जीव वस्तू असोत. या लिंगव्यवस्थेला केवळ पुरुष/स्त्री, सजीव/निर्जीव, लहान/मोठे (आकार) असा कोणताही एकच एक निकष नाही. कारण काही असो, लिंग बहाल करण्यात मराठीसह आपल्या भारतीय भाषा फार उदार आहेत हे मात्र निश्चित. 'कॉलेज, 'ऑफिस', 'पेन' यांसारखे शब्द मूळ इंग्रजीप्रमाणे मराठीतही नपुंसकलिंगी आहेत; पण दक्षिण गुजराती, हिंदीत ते स्त्रीलिंगी होतात. 'पतंग' हा शब्दही दक्षिण गुजराती व हिंदीत स्त्रीलिंगी तर मराठीत पुंलिंगी मानला जातो. पदनामांच्याबाबत पुंलिंगी पदनामांना आ, ई, इका असे प्रत्यय लागून त्यांची स्त्रीलिंगी रूपं तयार झालेली दिसतात. शिवाय इंग्रजीत ही पदनामं उभयलिंगी असली तरी मराठीत त्यांची वेगळी स्त्रीलिंगी रूपं वापरणं क्वचित ठिकाणी अधिक प्रतिष्ठित/सुसंस्कृत/परिणत प्रज्ञेचं मानलं जातं.

ग्रामीण भागात पदनामं आणि आदरार्थी बहुवचनांबाबत गमतीशीर प्रकार

आढळतात. आमच्या नवापूरला 'मॅडम' जरी संख्येनं एक असली तरी तिच्या संदर्भात बोलताना विद्यार्थी 'मॅडमांनी' सांगितले, 'मॅडमांनी' बोलावले असं म्हणताना दिसतात. कदाचित मॅडम हाच मूळ आदरार्थी शब्द आहे, याची जाणीव नसल्यामुळे मॅडमचं 'मॅडमा' असं आदरार्थी रूप केलं जात असावं. आणि म्हणूनच 'मॅडम'नी सांगितलं. 'मॅडम'नी बोलावलं' असं म्हटल्यास त्यांच्याबद्दल अनादर व्यक्त होईल की काय, अशी भीती वाटत असावी.

आदिवासी, भटक्या जमातींच्या बोलीत आदरार्थी बहुवचन प्रचलित नाही. त्यामुळे त्या त्या बोलीच्या लकबींनुसार 'अरे मास्तऱ्या', 'अरे डाकतऱ्या', 'अरे सायेबड्या/शेट्या' अशी संबोधनं या बोलीभाषकांकडून वापरली जातात. अर्थात बोलणाऱ्याच्या मनात संबंधिताबद्दल अनादर व्यक्त करण्याची भावना असते असं नाही. बोलणाऱ्याच्या बोलीच्या लकबींनुसार असं होतं. असं असलं तरी ते प्रथमच ऐकणाऱ्याच्या मनाला ते खटकल्याशिवाय राहात नाही.

पूर्वी 'बाई' आणि 'गुरुजी' ही अनुक्रमे शिक्षिका आणि शिक्षक यांच्यासाठी आदरार्थी संबोधनं म्हणून आपल्याकडे वापरली जात होती. पण अलीकडे इंग्रजाळत चाललेल्या आपल्या समाजात ही अस्सल मराठी संबोधनं सपक, मागासलेली, क्वचित अनादर करणारी वाटू लागली आहेत. 'पाटीलबाई' आणि 'पाटीलगुरुजी' यांना आपण 'पाटील मॅडम' आणि 'पाटील सर' असं म्हटलं तर अधिक बरं वाटतं. ('मास्तर' आणि 'सर' या दोन इंग्रजी शब्दांतही 'मास्तर'पेक्षा 'सर' हा शब्द अधिक प्रतिष्ठित का बरं मानला जात असेल ?) ■

**'ऋणानुबंध', ५६/ब, मंगलदास पार्क, नवापूर 425418, जि. नंदुरबार.**
**दूरध्वनी ०२५६९-२५०९१४**

सूत्र ही एक वाङ्मयीन शैली आहे. एकच आशय वेगवेगळ्या शैलींत मांडता येतो. सूत्र-शैलीचा उद्देश एखादा विषय संक्षेपानं मांडणं हा आहे, आणि तिचा संबंध प्राचीन काळच्या अध्ययन पद्धतीशी आहे. या पद्धतीत भर होता तो अध्ययनविषय सारांशरूपानं मुखोद्गत करण्यावर. या गरजेतून सूत्रशैली जन्माला आली. विषय मुखोद्गत करण्यावर भर नव्हता, वाचनावर होता, अशा परंपरांत सूत्रशैली जन्माला आली नाही. ही शैली भारतातच अस्तित्वात होती अशी इतिहासाची साक्ष आहे. या घटनेचं मूळ मुखोद्गतता-प्रधान अध्ययनशैलीत सापडेल.

प्रा. कृष्ण श्री. अर्जुनवाडकर
भारत इतिहास संशोधन मंडळ त्रैमासिक, खंड ८१-८२, क्रमांक ९-१६,
जुलै २००४-एप्रिल २००६, पृष्ठ ४१-४२

# 'म्हणणे'चे रूप 'म्हटलं' कसे काय ?

अशोक रा. केळकर

[संदर्भ : २४:२, उन्हाळा, २००६ नारायण मुकुंद पाटील यांची शंका]

इंग्रजी कोशात एखाद्या शब्दाची महत्त्वाची अनियमित रूपे सुरुवातीलाच कंसात देण्याचा उपयुक्त प्रघात आहे. उदाहरणार्थ, child (plural children), go (past went, pp gone). आपल्याकडे दुर्दैवाने तो नसल्यामुळे आपल्याकडे सामान्यत: त्यांच्याकडे लक्ष जात नाही. पाटील यांचे ते गेले याचा आनंद वाटला.

मोरो केशव दामल्यांसारख्या साक्षेपी व्याकरणकाराचे अर्थातच याकडे लक्ष गेलेले आहे. (दामले, छेदक ३७८ पाहावा.) धरिला/धरला, बसला सारख्या नियमित धातूंची दखल घेऊन ते गायला, निघाला, बघितला, गेला सारख्या अनियमित रूपे असणाऱ्या धातूंकडे वळतात. 'म्हण', 'खण' आणि 'हाण' धातूंची भूतकाळी पुढील रूपे ते नोंदवतात.

'म्हणाला' (कर्तरी), म्हटला (कर्मणी)

'खणला, खंटला'

'हाणिला, हांटला'

आजच्या बोलभाषेत आपल्याला 'म्हण' धातूची 'म्हणाला', 'म्हटला' खेरीज 'म्हणला', 'म्हंटला' ही रूपेही आढळतात. 'म्हणला' 'म्हणाला', 'म्हटला', 'म्हंटला' ही रूपे कर्त्याप्रमाणे चालतात. (ती म्हणली, म्हणाली, म्हटली, म्हंटली) तर 'म्हटला, म्हंटला' ही रूपे कर्मणी चालतात.

तिने श्लोक म्हटला/म्हंटला. (तुलनेसाठी : ती श्लोक म्हणाली/म्हणली.)

तिने ओवी म्हटली/म्हंटली. (तुलनेसाठी : ती ओवी म्हणाली/म्हणली.)

तिने त्याला काय म्हटलं/म्हंटलं ? (तुलनेसाठी : ती त्याला काय म्हणाली/म्हणली ?)

आता मूळ शंकेकडे वळू. त्यासाठी दोन गोष्टींकडे लक्ष देऊ. एक म्हणजे 'म्हण'प्रमाणे चालणारे 'खण', 'हाण' हे धातूही णकारान्त आहेत. त्यांची खंटला,





अनुक्रमणिका

हांटला ही रूपे आज मला जरी आढळली नाहीत तरी दामल्यांना १९११ साली ती आढळली असणार. ('विण/विणला' यासारखे इतर णकारांत धातू नियमित चालतात एवढे मात्र खरे.) दुसरी गोष्ट वर्तमानकाळातली या धातूंची बोलभाषेतली रूपे.

ती श्लोक म्हणते/म्हंटे.

ती खड्डा खणते/खंटे.

ती स्वेटर विणते/विंटे.

टकाराचा चंचुप्रवेश इथे उच्चारणाच्या ओघात कसा होऊ शकतो हे यावरून दिसेल. उच्चारणाच्या ओघात होणारे दोन प्रकारचे वर्णव्यापार इथे दिसतात. एक म्हणजे दंत्य तकारात मूर्धन्य णकाराच्या संगतीने मूर्धन्यत्व शिरणे. दुसरा म्हणजे नासिक्य णकार नंतरच्या जिभेच्या अग्राचा सहभाग असणाऱ्या पण नासिक्य नसणाऱ्या व्यंजनाच्या संगतीत आपले नासिक्यत्व अंशतः (म्हंटला) किंवा पूर्णतः (म्हटला) गमावून बसणे. (या दुसऱ्या व्यापाराची इतरही काही उदाहरणे पाहता येतील : वान्रं चा उच्चार वान्द्रं होऊ लागतो, इंग्रजीतलं Henry चे Hendrickson होणे किंवा genre चे gender होणे.

जुन्या मराठीचा व्यासंग असणाऱ्या मंडळींना आणखीही तुलनीय उदाहरणे सापडावीत. भाषेचे निरीक्षण करताना कान आणि डोळे दोन्ही उघडे ठेवावे लागतात. ■

७, धनंजय, ७५९/८३, भांडारकर रस्ता, गल्ली ६ द्वारा, पुणे 411004.

## प्रतिसाद ३

**शोभना गोखले**

'भाषा आणि जीवन' २४:३ / पावसाळा २००६ मध्ये प्रा. डॉ.अशोक रा. केळकर यांचा 'प्राध्यापक डॉ. सुमित्र मंगेश कत्रे यांची कार्यशैली' हा उत्तम लेख वाचला. त्यामध्ये "डॉ. कत्रे हे डेक्कन कॉलेज हे संशोधनसंस्था म्हणून पुनरुज्जीवित झाल्यावरचे पहिले संचालक होते (१९४२-१९७१)" असा उल्लेख आहे.

डेक्कन कॉलेज संशोधनसंस्था म्हणून १९३९ साली पुनरुज्जीवित झाले आणि १९३९ ते १९४२ या कालखंडात प्रा. आय्.जे.एफ. तारापोरवाला हे डेक्कन कॉलेजचे पहिले संचालक होते. डॉ. कत्रे हे १९४२ ते १९७१ या कालावधीत दुसरे संचालक होते, याची नोंद घेणे आवश्यक आहे. ■

'अभिजात', सी-१४, अनिकेत सोसायटी क्र १, स्वामी विवेकानंद मार्ग, बिबवेवाडी, पुणे 411037.



अनुक्रमणिका

प्रतिसाद ४

# जेण्डर आणि सेक्स

माधवी कोल्हटकर

संदर्भ : 'भाषा आणि जीवन' उन्हाळा २००६, 'भाषेतल लिंगभेद' हे संपादकीय. व्युत्पत्तिदृष्ट्या पाहिले तर gender हा शब्द जुन्या इंग्लिशमधल्या gendre, आणि आधुनिक इंग्लिशमधल्या genter या शब्दांशी निगडित असून ते दोन्ही शब्द लॅटीन genus या शब्दावरून आलेले आहेत. genus या शब्दाचा अर्थ birth किंवा family असा आहे. म्हणजेच gender हे प्राकृतिक लिंग आहे. इंग्लिशमधील शब्दांचे लिंग, काही मोजके अपवाद वगळता, प्राकृतिक लिंगावरून ठरत असल्याने ते व्याकरणिक लिंगही आहे. याउलट sex हा शब्द secare म्हणजे to divide, विभाग करणे किंवा भेद करणे या क्रियापदापासून आलेला आहे. शिरगणती किंवा निवडणूक यासाठी जेव्हा स्त्रीपुरुषभेदावर आधारित नोंदी करायच्या होत्या, त्या वेळी हा शब्द लिंग किंवा लिंगभेद याअर्थी रूढ झाला.

या 'सेक्स' या शब्दाचा इतिहास मोठा मनोरंजक आहे. आताचा त्याचा अर्थ जरी स्त्रीपुरुषांमधील शरीरसंबंध असा असला तरी मुळात तो दोघांमधील 'भेद' किंवा 'विभाग', 'विभाजन' दाखवणारा आहे. नंतर भेददर्शक म्हणून चिन्ह किंवा लिंग → विशिष्ट अवयव → त्यावरून शरीरसंबंध असा अर्थविस्तार झाला.

लॅटीनमधे secare या क्रियापदापासून झालेल्या secus किंवा sexus या शब्दावरून इ.स.च्या चौदाव्या शतकात तो इंग्लिशमधे प्रविष्ट झाला. मानवसमूहातील पुरुषगट किंवा स्त्रीगट असा तेव्हा त्याचा अर्थ होता. maal sex आणि femaal असा उल्लेख इ.स. १३८२मध्ये आढळतो. पण सोळाव्या शतकापर्यंत तो तितकासा वापरला जात नसे. पण त्यानंतर मात्र तो सर्रास वापरलेला दिसतो.

नंतर हा शब्द स्त्रियांच्या बाबतीत विशेषत्वाने वापरला गेलेला आढळतो. उदा. 'द जंट्ल् सेक्स' (१६वे शतक),'द वीकर सेक्स' (१७वे शतक), 'द फेअरर सेक्स' (१७वे शतक) याखेरीज सोळाव्या शतकानंतर 'दि सेक्स' हा शब्द स्त्रिया याच अर्थी वापरला जाऊ लागला. १९व्या शतकापर्यंत त्याचा या अर्थाने वापर होताना दिसतो. एकोणिसाव्या शतकानंतर 'द सेकंड सेक्स' असाही वाक्प्रचार रूढ झालेला दिसतो.

■

८८५,/३, भांडारकर मार्ग, ६वी गल्ली, पुणे 411 004.

**प्रतिसाद ५**

शे. दे. पसारकर

संदर्भ : 'भाषा आणि जीवन' पावसाळा २००६.
'परमरहस्य' या ग्रंथाची मी सिद्ध केलेली पाठ-चिकित्सक प्रत इ.स. २००१मध्ये 'श्रीमन्मथशिवलिंगकृत परमरहस्य' या नावाने शैवभारती शोधप्रतिष्ठान, जंगमवाडी मठ, वाराणसी (उ.प्र.) या संस्थेने प्रकाशित केली आहे.

श्रीमन्मथस्वामी आणि सर्व वीरशैव मराठी संतकवी आपल्या पंथाचा उल्लेख 'वीरशैव' असा करतात; 'लिंगायत' नव्हे.

'लिंगायत साहित्य' हा शब्दप्रयोग महाराष्ट्रात प्रचलित नाही. ■

'उषास्वप्न', १२६-ब, मार्कंडेय नगर, सोलापूर 413003.

---

## माझे नाठाळ भाषिक जीवन

माझा व्यक्तिगत अनुभव बोलका आहे. त्याबद्दल थोडेसे. मी जेव्हा माध्यमिक शाळेत आठवीत संस्कृत न घेता फ्रेंच शिकण्याचे ठरवले तेव्हा केवढा गहजब झाला होता ! (माझ्या आईवडिलांनी मला नेहमीच स्वातंत्र्य दिले होते एवढे मात्र इथे नमूद करतो.) नंतर महाविद्यालयात विशेष विषय म्हणून इंग्रजी भाषा-साहित्य हा विषय घेतला तेव्हा माझी कीव करण्यात आली. (आता स्वातंत्र्यप्राप्तीनंतर इंग्रजीची काय किंमत राहणार आहे ? तुला नोकरी तरी मिळेल का ? आता कॉलेजमधले स्पेशल इंग्लिश बंद करू या ! इत्यादी) नंतर जेव्हा भाषाविज्ञान विषयाकडे मी वळलो तेव्हा माझ्या मूर्खपणाचा उद्धार झाला. (अरे, इंग्रजीला काही मरण नाही, या नव्या फॅडचा काय भरवसा ? – मी म्हणे, आज मी तरुण आणि अविवाहित आहे, आता तरी थोडेसे धाडस करू की नको ? – गुणवत्तेने माझ्या खालोखाल असलेल्या एका मराठी तरुणाने डेकन कॉलेजने विशेष प्रशिक्षणासाठी दिलेला प्रवेश नाकारला.) नंतर या मूर्खपणापायी मला जी काही दालने खुली झाली ती पाहिल्यावर... (केळकर, अहो तुम्हाला तर लॉटरीच लागली म्हणायची !) अध्यापनाच्या नोकरीत स्थिर झाल्यावर तरी मी खुंटाला धरून रहायचे ? तरी मी भाषा-विज्ञानापासून साहित्य, संस्कृती, समाज, तत्त्वज्ञान, चिन्हमीमांसा सारख्या इतर क्षेत्रात मुशाफिरी करायला तयार ! (या माझ्या अव्यापारेषु व्यापाराबद्दल माझी कानउघाडणी करणारेही निघाले.)

–अशोक रा. केळकर

# परिषद वार्ता

विजया चौधरी

(१) कार्यकारी मंडळाची पुनर्रचना

परिषदेचे अध्यक्ष डॉ. अशोक रा. केळकर यांनी ५ जून २००६ला प्रकृति-अस्वास्थ्यामुळे परिषदेच्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला. त्यांच्या जागी कार्यकारी मंडळाने दि. २२ जून २००६च्या बैठकीत प्रा. प्र. ना. परांजपे यांची एकमताने निवड केली. परिषदेचे अध्यक्ष व 'भाषा आणि जीवन'चे प्रारंभापासून सुमारे दहा वर्षे प्रमुख संपादक या नात्याने डॉ. केळकरांनी परिषदेसाठी केलेले कार्य अनमोल आहे. त्याबद्दल परिषद त्यांची निरंतर ऋणी राहील.

प्रा. प्र.ना. परांजपे यांची अध्यक्षपदी निवड झाल्यामुळे रिकाम्या झालेल्या उपाध्यक्षपदी डॉ. मृणालिनी शहा यांची एकमताने निवड करण्यात आली.

डॉ. मिलिंद मालशे (मुंबई) व डॉ. कल्याण काळे (पुणे) यांचा स्वीकृत सभासद म्हणून कार्यकारी मंडळात समावेश करण्यात आला.

(२) देणगीदारांविषयी कृतज्ञता

१. प्रा. लीला पाटील (कोल्हापूर) रु. ४०००/- देणगी

२. श्रीमती विजया चौहान, (मुंबई) रु. ३०००/- देणगी

३. श्री श.चिं. देवधर (पुणे) रु. ५०००/-

परिषदेला मिळालेल्या देणग्या भारतीय आयकर अधिनियमाच्या ८०जी अन्वये करमुक्त आहेत.

(३) शोकप्रस्ताव

परिषदेचे आजीव सदस्य व 'भाषा आणि जीवन'चे एक लेखक मो.वि.भाटवडेकर यांचे नुकतेच निधन झाले. कार्यकारी मंडळाने त्याविषयी शोक व्यक्त केला.

(४) दहावी सर्वसाधारण सभा

मराठी अभ्यास परिषदेची दहावी सर्वसाधारण सभा रविवार दि. ३०.०७.२००६ला पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळाच्या राजवाडे सभागृहात

सायंकाळी ५ वाजता आयोजित करण्यात आली होती. आवश्यक गणसंख्येअभावी सभा १५ मिनिटे स्थगित करून ठीक सव्वापाच वाजता कामकाज सुरू करण्यात आले. अध्यक्षस्थानी परिषदेचे नवनियुक्त अध्यक्ष प्रा. प्र. ना. परांजपे होते.

सर्वप्रथम कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी कार्यकारी मंडळाच्या पुनर्रचनेविषयी माहिती दिली. त्यानंतर गतवर्षी दिवंगत झालेले डॉ. श्रीरंग संगोराम, किसन होळकर तसेच नुकतेच दिवंगत झालेले शरचन्द्र बडोदेकर, गुलाबदास ब्रोकर यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. आजीव सदस्य विजया चौहान यांचे पत्र सभेला वाचून दाखवण्यात आले. त्यात काही उपक्रम सुचवून त्यासाठी परिषदेला साहाय्य करण्याचा प्रस्ताव विजया चौहान यांनी ठेवला आहे.

कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी नवव्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त सभागृहापुढे सादर केले. त्याला ठरावाद्वारे मान्यता देण्यात आली. श्री. श्रीधर देशपांडे ठरावाचे सूचक होते व डॉ. सुप्रिया सहस्रबुद्धे या अनुमोदक होत्या. कार्यवाहांनी परिषदेच्या गतवर्षातील उपक्रमांविषयीचे कार्यवृत्तही सादर केले. यामधे मराठी अभ्यास परिषद व पुणे विद्यापीठाचा मराठी विभाग यांनी संयुक्तपणे १४ व १५ ऑक्टो. २००५ रोजी आयोजित केलेले 'मराठी विषयाची दुरवस्था : कारणे व उपाय' या विषयावरील चर्चासत्र, महाबँक भाषाविषयक पुरस्काराचे दि. १७-१२-०५ रोजी समारंभपूर्वक केलेले वितरण, तसेच १-५-२००६ रोजी मराठी अभ्यास परिषद व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित केलेली 'मराठी व्याकरणाचा पुनर्विचार' या विषयावरील चर्चा या उपक्रमांचा समावेश होता.

परिषदेच्या 'भाषा आणि जीवन' या पत्रिकेने २४व्या वर्षात पदार्पण केले असून पत्रिकेचे वार्षिक वर्गणीदार १७५ व संस्था – वर्गणीदार ११५ आहेत. परिषदेची आजीव सदस्यसंख्या २९० असल्याची माहितीही सभागृहाला देण्यात आली. कार्यवृत्त मंजूर करण्याविषयीचा ठराव श्री. अ. नी. नवरे यांनी मांडला व त्याला श्रीमती सुधाताई गोवारीकर यांनी अनुमोदन दिले.

कोषाध्यक्ष डॉ. गं.ना. जोगळेकर यांनी २००५-२००६ या आर्थिक वर्षाचा लेखापरीक्षित ताळेबंद आणि २००६-२००७ या वर्षासाठीचा अर्थसंकल्प सभागृहापुढे सादर केला. ताळेबंद व अर्थसंकल्प मंजूर करण्याविषयीचा ठराव श्री. श्रीधर देशपांडे यांनी मांडला व डॉ. मृणालिनी शहा यांनी त्याला अनुमोदन दिले. या ठरावावरच येत्या आर्थिक वर्षासाठी लेखपरीक्षक म्हणून श्री. ए. जे. दिघे व कायदेविषयक सल्लागार म्हणून ॲड. पराग देशपांडे यांच्या पुनर्नियुक्तीचा ठराव संमत करण्यात आला. त्याचे श्री. अ.नी. नवरे हे सूचक होते तर डॉ. विजया देव अनुमोदक होत्या.

परिषदेने रौप्यमहोत्सवी वर्षात पदार्पण केले आहे. त्यानिमित्त विविध उपक्रम हाती घेण्यात येणार असल्याची माहिती सभागृहाला देण्यात आली. परिषदेचा रौप्यमहोत्सवी कार्यक्रम महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सहकार्याने करण्यात यावा, तसेच विद्यार्थ्यांसाठी निबंधस्पर्धा घेण्यात यावी, अशी सूचना श्री. अ.नी. नवरे यांनी केली. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी परिषदेने अध्यापक / प्राध्यापकांसाठी कार्यशाळा घेऊन अध्यापन पद्धतीविषयी मार्गदर्शन करावे अशी सूचना केली.

आयत्यावेळचे विषय म्हणून मराठी भाषाशास्त्रविषयक संशोधनाचे सध्याचे स्वरूप, व्याकरणाच्या पुनर्मांडणीची बदलती गरज, वाचाशिक्षणासाठी अभ्यासक्रम तयार करण्याची आवश्यकता, भाषिक अपंगत्व असणाऱ्यांसाठी मराठीचे तंत्रशुद्ध शिक्षण अशा विविध विषयांचा उल्लेख करण्यात आला. या चर्चेमध्ये डॉ. माधवी कोल्हटकर, श्रीमती सुधा गोवारीकर, डॉ. कल्याणी दिवेकर, डॉ. विजया देव, डॉ. मॅक्सीन बर्नसन, श्री. श्रीधर देशपांडे हे सभासद सहभागी झाले होते.

अध्यक्ष प्रा. प्र.ना. परांजपे यांनी मराठीचे अस्तित्व टिकवणे व मराठीचा विकास करणे या दोन गोष्टींमधे फरक असल्याचे स्पष्ट केले. महाराष्ट्राच्या भाषिक गरजा पूर्ण करण्यासाठी सद्यःस्थितीत मराठी, इंग्रजी व हिंदी या सर्व भाषांकडे पाहण्याचा दृष्टिकोण संकुचित असू नये व मराठीच्या विकासासाठी भाषाविषयक दृष्टिकोण निकोप ठेवणे गरजेचे आहे, असेही ते म्हणाले. परिषदेच्या आजवरच्या वाटचालीत डॉ. अशोक केळकर यांनी दिलेल्या बहुमोल सहकार्याबद्दल त्यांनी कृतज्ञता व्यक्त केली.

डॉ. सुप्रिया सहस्रबुद्धे यांच्या आभार-प्रदर्शनानंतर सभेची सांगता झाली. ■

इ-५०३, गार्डन व्ह्यू, राधिका सोसा. पर्वतीनगर, सिंहगड रोड, पुणे 411030.
दूरभाष - २४२५०५५९

**शालेय पुस्तकातील अनाकलनीय (जड!) भाषा**

चौथी इयत्तेत शिकणाऱ्या चिन्मयला त्याची आई 'विज्ञानातील जमिनीची रूपे आणि उपयुक्तता' या पाठातील 'कुथितमृदा' कशी तयार होते, ही संकल्पना समजावून सांगत होती. चिन्मयला कुथितमृदा या शब्दाचे उच्चारणच येत नव्हते. तो अगदी रडकुंडीला आला होता !

विज्ञानात 'स्थायू' हा शब्द वारंवार वापरला जातो. इंग्रजीतील 'सॉलिड' शब्द उच्चारताच भरीव वस्तू चटकन डोळ्यासमोर येते; पण स्थायू शब्दातून तसा बोध होतो का? पूर्वी वापरला जाणारा 'धन' हा शब्द हा बदलला गेला?

विद्या सातळकर, 'मायबोली बहरताना...',
- 'संपा.- शीला कोलटकर, आपणच पुणे, २००५'

## भाषा आणि जीवन २००६ : लेखनसूची

नीलिमा गुंडी , मृणालिनी शहा, प्र.ना. परांजपे

'भाषा आणि जीवन'च्या इ.स. २००६ या २४व्या वर्षाच्या चार अंकांतील (अंक १ : हिवाळा, अंक २ : उन्हाळा, अंक ३ : पावसाळा, अंक ४ : दिवाळी) लेखकाची लेखक व शीर्षक-सूची.

### लेखक-सूची : (नाव/अंक : पृष्ठ)

## लेख (शीर्षक/लेखक/अंक : पृष्ठ)

## परीक्षण-लेख



## पुस्तक-परीक्षणे

## सदरे



एखाद्या मठाचे किंवा बुवा-बाबाचे प्रस्थ कसे वाढते ? बुवाच्या चमत्काराच्या गोष्टी काहीजण खुबीने पेरत असतात. प्रत्यक्षात असे करणारांची बाबावर अजिबात श्रद्धा नसते. मात्र, बाबांचे 'मार्केटिंग' करण्यामध्ये त्यांचे स्वार्थ सामावलेले असतात. त्यामुळे काहींच्या हाताला काम मिळते. काहींच्या हाती घबाड लागते. काहींचे पुनर्वसन होते, तर काहींना आपोआपच प्रतिष्ठा मिळून जाते. साहित्य संमेलनाचे मार्केटिंग आणि त्याचे एकूण स्वरूप याविषयी यापेक्षा आणखी वेगळे भाष्य शक्य नाही.

○ ○ ○

इथे एखाद्या साहित्यिकाला केवळ चांगले लिहून चालत नाही. त्याला 'निवडूनही' यावे लागते. अशा रोजच्या रणांगणमुळे साहित्यिकाचा राजकरणी तरी होतो किंवा डिप्लोमॅट. साहित्यिकांमधील विविध गट, संस्था, प्रकाशक, माध्यमे यांच्याशी बरे संबंध ठेवण्यातच त्याची निम्मी ऊर्जा खर्च होते. साधुत्वाची देखील पिसे झडावीत, अशी सत्ता काबीज करणाऱ्या साहित्यविषयक संस्थांनी हस्तिदंती मनोऱ्यातून लेखकांना बाहेर आणले खरे, पण त्यामुळे लेखकांचे लेखकपणच संपू लागले. सत्याला भिडणे संपले. लाचरांची मांदियाळी निर्माण झाली.

संजय आवटे, *दै. लोकसत्ता,* २६-१-२००६

**लेखक-परिचय**

- **प्रा. माधव नारायण आचार्य** - एम्.ए., मराठीचे निवृत्त प्राध्यापक. 'अनुषंग' (१९८१), 'मराठी व्याकरण विवेक' (१९९०, २००१), (महाराष्ट्र शासनाचे पारितोषिक, 'ज्ञानमयूरांची कविता' (१९९३), 'आर्याभारत : नवदर्शन' (१९९७) ही पुस्तके प्रकाशित. 'मोरोपंतांची सतीगीते' (१९८५, १९९४), 'मोरोपंत विरचित संशयरत्नावली (१९८५), 'मोरोपंतकृत श्लोककेकावली' (१९९४) या पुस्तकांचे संपादक. पैकी शेवटच्या पुस्तकास महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक सभेचे पारितोषिक. 'पंचपदवी ज्ञानदेवी' या ग्रंथाला महाराष्ट्र शासन पुरस्कार व संत साहित्य पुरस्कार.
- **डॉ. माधवी आपटे** - 'उपयोजित इंग्रजी भाषाविज्ञान' या विषयात एम्.लिट्.(सी.आय.इ.एफ. एल्., हैदराबाद, १९८०), त्याच विषयात पीएच्.डी. (मराठवाडा विद्यापीठ, १९८७) सरस्वती भुवन महाविद्यालय, औरंगाबाद येथे १४॥ वर्षे व डॉ. आंबेडकर-मराठवाडा विद्यापीठात ९ वर्षे अध्यापन. थायलंड व मेक्सिको येथेही अध्यापन. २००४पासून महात्मा गांधी मिशन, औरंगाबाद यांच्या 'भारतीय व विदेशी भाषा संस्थे'च्या संचालक. एमिली डिकिन्सनच्या ११५ कवितांचा अनुवाद व नोबेल विजेत्या १४ लेखकांच्या कथांचा अनुवाद 'नोबेल चतुर्दशी' प्रकाशित.
- **रेणुका ओझरकर** - मुंबई विद्यापीठातून भाषाविज्ञान या विषयात एम्.ए. सध्या म्हैसूर येथे भारतीय भाषा संस्थान या संस्थेच्या एका प्रकल्पात कनिष्ठ संशोधन सहायक म्हणून काम चालू.
- **डॉ. प्रभाकर ज. जोशी :** प्रपाठक व मराठी विभाग प्रमुख, प्रताप कॉलेज, अमळनेर, एम्.फिल. व पीएच्.डी. चे मार्गदर्शक. 'सामाजिक भाषाविज्ञान', 'उपयोजित मराठी'या पुस्तकांचे संपादक.
- **केशव सखाराम देशमुख** - जालना येथील श्रीमती दानकुंवर महिला महाविद्यालयातील मराठीचे विभागप्रमुख. गेली १७ वर्षे पदवी व पदव्युत्तर पातळीवर अध्यापन. 'साहित्य, समाज आणि संस्कृती', 'पीकपाणी - सप्रेम, संदर्भ आणि समीक्षा' या ग्रंथांचे संपादक. अकरावीच्या मराठीच्या पाठ्यपुस्तकाच्या संपादन-मंडळाचे सदस्य. विविध वाङ्मय पुरस्कारांच्या निवड-समित्यांचे सदस्य.
- **प्रदीप संतोष नेरूरकर** - अनियतकालिक चळवळीतील एक कवी व लेखक. वृत्तपत्रांतून चित्रकला-विषयक व ललितलेखन. झेन कथांचा तसेच 'झेन इन द मार्शल आर्टस' या ज्यो हॅमच्या पुस्तकाचा अनुवाद. हेन्री मिलरच्या एका दीर्घ मुलाखतीचा व 'च्वांग त्सु' या चिनी तत्त्वज्ञाच्या कथांचा अनुवाद. एक स्वशिक्षित चित्रकार. झेन कॅलिग्राफीच्या अक्षरांकारातून उत्स्फूर्त, अमूर्त आकार शोधण्याची व आकारातून निराकाराकडे जाण्याची उर्मी. मुंबईच्या जहांगीर आर्ट गॅलरीत १९७९मध्ये पहिले चित्र-प्रदर्शन. त्यानंतर मुंबई, दिल्ली व चेन्नई या ठिकाणी चित्रप्रदर्शने.
- **डॉ. सौ. शुभांगी अविनाश पातुरकर** - 'मराठी मुक्तछंद' या विषयावर पीएच्.डी. त्याच शीर्षकाचे पुस्तक १९९९मध्ये प्रकाशित. त्याला ग्रंथोत्तेजक सभा (पुणे), विदर्भ साहित्य संघ (नागपूर) यांचा म.म.वा.वि मिराशी पुरस्कार व विदर्भ संशोधन मंडळ (नागपूर) यांचा डॉ. बाळाजी पुरस्कार असे पुरस्कार. 'मंतरलेले दिवस' (२००३) हा ललितलेखांचा संग्रह प्रकाशित.
- **अ.द. मराठे** - संस्कृत व इंग्रजीचे ३७ वर्षे अध्यापन. 'गीतरामायण :शब्दसुरांचा मागोवा'चे सहलेखक. ग्रंथसमीक्षेचा पु.भा. भावे स्मृतिपुरस्कार. 'महाराष्ट्र टाईम्स'मध्ये परीक्षण- लेखन.
- **शरदिनी मोहिते (बाबर)** - मराठी व संस्कृत विषयांत एम्.ए..निरनिराळ्या ६० नियतकालिकां-मधून विविध विषयांवरचे लेख प्रकाशित, 'समाज शिक्षण माले'तून साहित्य, इतिहास, भाषा, भूगोल, शास्त्र, मानसशास्त्र इ. विषयांवरील पुस्तके प्रकाशित. बालांसाठी चार कादंबऱ्या, ऑल्विन टॉफ्लरचे 'थर्ड वेव्ह', शरचंद्र चतर्जींच्या 'देवदास' व 'परिणीता' यांची भाषांतरे प्रकाशित. 'समाज शिक्षण माले'च्या संपादनात व व्यवस्थापनात सहभाग.

## परीक्षणासाठी आलेली पुस्तके

- **'सूफी प्रार्थनांच्या किनाऱ्यावरून'** - श्रीधर नांदेडकर. तुला प्रकाशन, औरंगाबाद 431005. पृष्ठे १३२, किंमत १३०/- रुपये.
- **'मराठी मौखिक वाङ्मय'** - संपादक : रामदास आतकर, राजाराम झगडे. ॲन फेल्डहाउस. श्रीविद्या प्रकाशन, पुणे 411030. २००६, मोठ्या आकाराची ३२८ पृष्ठे, किंमत ५०० रुपये.
- **'रणांगण : समीक्षेची साठ वर्षे'** - एस.एस. नाडकर्णी, गोमंतक मराठी अकादमी, गोवा. २००६, पृष्ठे १६७, किंमत. १५०/- रुपये.
- **शरणागताचे स्तोत्र** - शशिकांत शिंदे, मानसी प्रकाशन, कोल्हापूर खुर्द, 413710. पृष्ठे ७९, किंमत ८० रुपये.

---

*※ मराठी अभ्यास परिषद : रौप्यमहोत्सवी वर्षाची सांगता ※*

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५/-, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/-, व्यक्तीला रु. १००/-, पंचवार्षिक वर्गणी रु.४५०/- परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु. १,००० आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** पाठवल्यास आपला पत्ता न विसरता लिहावा. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये २०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **मागील अंक :** 'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) काही अंकांचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/- आणि २००२ पासून प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-.

---

*※ मराठी अभ्यास परिषद : रौप्यमहोत्सवी वर्षाची सांगता ※*

**जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु.२,५००/-. अर्धे पान रु.१,५००/-. पाव पान रु.८००/-, शुभेच्छा रु.४००/-. आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत. इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**मुखपृष्ठासंबंधी :** दृक्कलेच्या रचनेसाठी अत्यावश्यक असणारा एक घटक : आकार. या वर्षी मुखपृष्ठांसाठी वर्तुळ, त्रिकोण आणि चौरस या तीन मूलभूत आकारांच्या रचनेत लिपीचा अविभाज्य घटक असलेल्या अक्षराच्या उपयोजनातून साकारलेली संकल्पना वापरली आहे. या रचनेतील अक्षरे भारताच्या समृद्ध लिपीसंस्कृतीचे प्रतिनिधित्व करणारी असून संपूर्णपणे संगणकसाह्याने घडलेली आहेत. प्राधान्य अर्थातच देवनागरीला असून अन्य रचनांमध्ये बंगाली, मल्याळम आणि गुजराती अक्षरांचा उपयोग केला आहे.

**चित्रकल्पना व अक्षर-निर्मिती :** विनय सायनेकर; दृश्य संकल्पना व संगणकसाहाय्य : सुप्रिया ग्वाग्कर.

---

अनुक्रमणिका

